सर्वसामान्य माणसासाठीं कायद्याचें पुस्तक

# मजेशीर निवाडे

रा. के. रानडे, LL. M.




रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४

# प्रकाशकाचे चार शब्द

न्याय खात्यांत वरिष्ठ हुद्यावर काम करीत असलेले श्री. **राम केशव रानडे**, एल्. एल्. एम्. यांचें २४ वें पुस्तक प्रकाशित करतांना आम्हांला अत्यंत आनंद होत आहे. श्री. रानडे यांच्या कितीतरी पुस्तकांच्या दुसऱ्या आवृत्त्या निघाल्या आहेत विद्यार्थीदशेंत ज्याप्रमाणें श्री. रानडे यांनीं निरनिराळ्या विषया-मध्यें प्राविण्य मिळविलें त्याप्रमाणें त्यांनीं साहित्याच्या निरनिराळ्या क्षेत्रांत प्राविण्य मिळविलें आहे. मॅट्रिकमध्यें पहिली 'जगन्नाथ शंकरशेट' शिष्यवृत्ति, बी. ए. मध्यें गणित विषय घेऊन पहिला वर्ग, व पुढें कायदा विषय घेऊन मुंबई विश्ववि-द्यालयाची संशोधनामुळें एल्. एल्. एम्. पदवी मिळविण्याचा पहिला मान अशा तऱ्हेची त्यांची विद्यार्थीदशेतील कारकिर्द ज्याप्रमाणें कौतुकास्पद आहे त्याचप्रमाणें साहित्य क्षेत्रांतील त्यांची कामगिरी देखील अभिनंदनीय आहे.

त्यांनीं आपलें लिखाण १९३८ सालापासून सुरू केलें असें दिसते, त्यावेळीं 'सत्यकथा' मासिकानें लघुकथांची चढाओढी लावली होती व त्या चढाओढींत श्री. रानडे यांच्या 'पहिला नवरा' या गोष्टीस पहिलें बक्षिस मिळालें. पुढें त्यांनीं साहित्यक्षेत्रांतील निरनिराळ्या दालनांमध्यें प्रवेश करून बरेंच मौलिक साहित्य निर्माण केलें. त्यांचें लिखाण, त्यांचें भाषण अथवा त्यांचें प्रवचन यांच्यामध्यें एक विशेष मौलिक दृष्टी प्रत्ययास येते. आणि याचमुळें त्यांच्या लिखाणाला आणि भाषणाला विशेष किंमत आहे. त्यांचे टीकाकार व भाष्यकार एकमुखानें म्हणतात कीं, कायदा क्लिष्ट व किचकट आहे पण या नियमाला श्री. रानडे यांचीं पुस्तकें अपवाद आहेत.

गणित म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें भाषा विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांचें मनांत तिडीक उत्पन्न होते त्याप्रमाणें कायदा म्हटला म्हणजे सर्वसामान्य माणसांचें मनांत तिटकारा उत्पन्न होतो. असे असतांहि क्लिष्ट विषय मनोरंजक भाषेंत सांगण्याच्या हातोटीमुळें श्री. रानडे यांचें कोणतेहि पुस्तक वाचक आधाशाप्रमाणें वाचून काढतात असें न्या. नाडगीर यांनीं म्हटलें आहे. त्यांच्या पुस्तकाबद्दल निरनिराळ्या कायदे-

# १

# अंगठीची चोरी

समुद्राच्या काठावर पुनः पुनः लाटा आदळल्यामुळें त्यांचा एकसारखा एकच आवाज घुमूं लागवा, त्याप्रमाणे त्या खेड्यांत "काय झालं? काय झालं?" हे शब्द जिकडे तिकडे घुमू लागले.

तसेंच पाहिलें तर वरवर दिसायला ती एक साधीसुधी गोष्ट होती. पण ह्या साधासुध्या गोष्टीभोवती एकाद्या कोळ्यानें विणलेल्या जाळ्याप्रमाणें जे धागे-दोरे निर्माण करण्यांत आले होते त्यामुळें त्या गोष्टीला फारच बडे स्वरुप प्राप्त झालें होतें.

मध्यप्रांतांतील एका खेड्यांत कुंदा नांवाची एक विधवा स्त्री राहत असे. आपला शेजारी मुकुंद ह्याच्यापासून तिनें एक अंगठी २५ रुपयाला खरेदी केली. तिनें १० रुपये दिले व १५ रुपये मागाहून देते म्हणून मुकुंदाकडून तिनें अंगठी घेतली. बाकींचें रुपये कुंदा देईना तेव्हां मुकुंदा तिच्या घरीं गेला व त्यानें १५ रुपये मागितले. पण कुंदा म्हणाली–

"मी बाकीचे १५ रुपये देणार नाहीं व ही अंगठीहि देणार नाही." अंगठी कुंदेजवळच पडली होती. ती मुकुंदाने घेतली व तो कुंदेला म्हणाला–

" बाकीचे १५ रुपये देईपर्यंन्त ही अंगठी मी तुला देणार नाहीं." असें म्हणून ती अंगठी घेऊन मुकुंदा आपल्या घराकडे निघून गेला.

कुंदेला कांहीं लोकांनी सल्ला दिला व त्याप्रमाणें तिनें मुकुंदावर चोरीची फिर्याद गुदरली.

मध्यप्रांत – वऱ्हाडच्या पंचायत कायद्याप्रमाणें ही चोरीची फिर्याद न्यायपंचायतीपुढे चालली.

ह्या फिर्यादीचें बाबतींत जो पुरावा घेण्यांत आला त्यामध्यें कितीतरी नवीनच गोष्टी उजेडांत आल्या व त्या नवीन गोष्टीमुळेच ह्या फिर्यादीबद्दल जो तो चर्चा करुं लागला.

कायद्याच्या काटेकोर नियमाप्रमाणें असें म्हणतां येईल कीं, न्यायपंचायतीनें जितक्या गोष्टी पुराव्यांत येऊं दिल्या तितक्या गोष्टी येऊं देणे वाजवी नव्हते. ज्या गोष्टी पुराव्यात स्वीकारण्यांत आल्या त्याचें स्वरुप थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास असें सांगता येईल.

मुकुंदाची बायको रखमा ही मुकुंदाकरितां सारा वेळ धडपडत असे. लग्नानंतर त्याच्या जीवनाशी ती पूर्णपणें समरस झाली होती, सागराला जाऊन मिळणाऱ्या सरितेप्रमाणें तिनें आपला सारा जीवनप्रवाह त्याच्या जीवन-सागरांत विलीन केला होता. ज्या ज्या वेळीं त्याच्यावर दुःखाचे, त्रासाचें व आपत्तीचें प्रसंग आले त्या त्या वेळीं आपल्या डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु त्याला दिसूं न देता तिनें त्याच्या डोळ्यांतील अश्रु पुसले होते. लग्नापूर्वी निराशावादी असणारा मुकुंद आज तिच्या कर्तबगारीमुळें कर्तृत्ववान बनला होता. गावांत जो तो म्हणत असें कीं, मुकुंदाच्या अलौकिक प्रगतीला सर्वस्वी कारणीभूत कोण असेल तर ती रखमाच होय.

असें असूनहि मुकुंद एका स्त्रीच्या प्रेमपाशांत सांपडला. ती स्त्री म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून त्याच्या शेजारी रहाणारी कुंदा. लौकीक अर्थानें कुंदेला सुंदर म्हणतां आले नसते. पण सौंदर्यालासुद्धा मागे टाकणारी जी एक अलौकिक

मोहकता असते ती तिच्या सर्वांगांतून ओसंडत होती. तिच्या मोहक हावभावांनी मुकुंद तिच्याकडे आकृष्ट झाला व त्याला वाटूं लागले कीं शक्यतर आपण कुंदेशी लग्न करावे.

हा प्रकार जेव्हां रखमेला कळला तेव्हां विजेचा झटका बसावा त्याप्रमाणें तिच्या मनाला एकदम हादरा बसला. काचपात्र फुटून भग्न व्हावें त्याप्रमाणें तिच्या आशा आकांक्षा उध्वस्त झाल्या. भयंकर वावटळींत सांपडलेल्या पाचोळ्याप्रमाणें तिच्या भावना सैरावैरा धावूं लागल्या. अशा त्या शून्य विकल अवस्थेंत तिनें आपलें अंग धाडकन् हांथरुणावर टाकले व जोराजोरानें हुंदके देऊन ती रडूं लागली

तिचें रडणें ऐकून मुकुंदा तिच्याजवळ गेला. दोघांची पुष्कळच बोलाचाली झाली आणि शेवटी मुकुंदानें शपथ घेऊन म्हटलें—

"मी चुकलो ! मला क्षमा कर ! तुझ्या त्यागाची किंमत मला समजली नाहीं......पण आता मी कधीं कुंदेवर प्रेम करणार नाहीं."

असल्या स्वरुपाच्या गोष्टी पुराव्यात आल्यामुळें लोकांना वाटले कीं कुंदेने जी फिर्याद केली त्याच्या पाठीमागें बरेंच मोठें प्रेमप्रकरण आहे. आंगठी चोरल्याची हकीकत व बाकीच्या प्रेमप्रकारच्या गोष्टी ऐकून लोकाना वाटले कीं मुकुंदानें कुंदेला जी आंगठी दिली ती प्रेमाची आंगठी होती. ते प्रेम जेव्हां संपले तेव्हा त्यानें ती आंगठी परत घेतली आणि मग कुंदेनें संतापून त्याचेवर चोरीची फिर्याद केली.

न्यायपंचायतीचें सभासद असें म्हणूं लागले कीं, रखमेसारखी साध्वी पत्नी असतांना तिच्या सुखदुःखाची पर्वा न करतां मुकुंदानें कुंदेवर प्रेम करावे ही गोष्ट अक्षम्य नाहीं कां ? असल्या अक्षम्य अपराधाबद्दल मुकुंदाला शिक्षा देणें उचित नव्हे कां ?

**असाच कांहींसा विचार करुन व पुराव्यांत आलेल्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन न्यायपंचायतीनें मुकुंदाला दोषी ठरविलें व त्याला ४० रु. दंड केला.**

या निकालावर मुकुंदानें तपासणी अर्ज केला.

वरच्या कोर्टांत तक्रारी सुरूं झाल्यावर मुकुंदाचें वकील म्हणाले—

"पुराव्यांत असें आले आहे कीं, ४० वर्षांच्या मुकुंदानें पत्नीच्या त्यागाची किंमत न करतां कुंदेवर प्रेम करण्याचा प्रयत्न केला. मुकुंदानें आंगठी चोरली किंवा नाहीं व तो चोरीच्या आपराधाखालीं दोषी आहे किंवा नाहीं एवढाच प्रश्न या कज्जांत आपणास मुख्यत्वेकरून पहावयाचा आहे. परंतु खालच्या कोर्टांत या मुख्य गोष्टीला गौण स्वरूप देऊन मुकुंदा व कुंदा यांच्या प्रेमप्रकारालाच प्राधान्य देण्यांत आले आहे. तो प्रेमप्रकार पाहून मला एका इंग्लीश लेखकाच्या उद्गाराची आठवण होते. त्या लेखकानें असें म्हटलें आहे कीं –

"विवाहीत मनुष्य ४० चे घरांत आला कीं, त्याच्या प्रणयभावनांना पुनः एकदां बहर येतो. नेहमीच्या जीवनाला तो कंटाळून गेलेला असतो व दुसऱ्या एखाद्या स्त्रीच्या सान्निध्यांत लाभणाऱ्या उन्मादाचा अनुभव घेण्याची त्याला अनावर इच्छा होते. पायाखालची मळलेली वाट सोडून शोभिवंत फुलांच्या ताटव्यांनी बहरलेल्या कुरणांतून जाणाऱ्या अपरिचित पायवाटेवरून जाण्याला तो अधीर झालेला असतो. कांहीं दिवस या अज्ञात सुखाचा अनुभव घेतल्यावर पुरुषाला आपल्या पूर्वीच्या जीवनाकडे वळावेसे वाटते. जीवनाचा सारा प्रवाह बदलून नव्या अज्ञात प्रवाहांत उडी घेण्याचें धैर्य त्याच्या ठिकाणीं आतां उरलेलें नसल्यामुळें तो पुनः आपला मार्ग बदलतो व अनोळखी सुंदर पायवाटेपेक्षा नेहमीची ओबडधोबड मळलेली वाट बरी असें म्हणूं लागतो.

"इंग्लिश लेखकाचें हें उद्गार मुकुंदाच्या बाबतीत खरे ठरलेलें आपणांस दिसतात. अशा परिस्थितीं मुकुंदानें वयाच्या चाळिसाव्या वर्षी दुसऱ्या एका स्त्रीवर प्रेम करण्याचा प्रयत्न केला त्याबद्दल त्याच्यावर रागावून त्याला शिक्षा करणें योग्य नव्हें. न्यायपंचायतीनें मुकुंदाचा जो अपराध मानला आहे त्यामध्यें चोरीच्या अपराधापेक्षां आपल्या पत्नीची पर्वा न करतां मुकुंदानें जो प्रेमप्रकार केला त्या अपराधालाच महत्त्व व किंमत आहे.

"कायद्याच्या कठोर भाषेंत बोलतांना असें म्हणतां येईल कीं, मुकुंदाचा प्रेम-प्रकार या कज्जांत गैरलागू आहे. ज्या गोष्टी पुराव्यांत आल्या आहेत व ज्याबद्दल

बाद नाहीं त्या पहिल्या म्हणजे कायदा असेच म्हणेल कीं, मुकुंदावर चोरीचा आरोप शाबीत होत नाहीं व त्याला खालच्या कोर्टानें केलेली शिक्षा रद्द केली पाहिजे.''

या कज्जांत वरच्या कोर्टानें जो निकाल दिला त्यामध्यें असें म्हटलें आहे कीं,

प्रस्तुतचा कज्जा म्हणजे एक नमुनेदार कज्जा आहे. खालच्या कोर्टानें जो ठराव दिला आहे त्यावरून असें दिसतें कीं, न्यायपंचायतीच्या सभासदांना कुंदा व मुकुंद यांच्याबद्दल जी माहिती होती त्याचा त्यांनी भरपूर उपयोग करून घेतला आहे. कायद्याचा असा एक दंडक आहे कीं, न्यायाधीशानें तिऱ्हाइतपणें कज्जाकडे पहावयाचें असते. व कोर्टाच्या आवारांत चार भिंतीच्या आंत जेवढा पुरावा होईल तेवढाच विचारात घेणेचा असतो.

कायद्याचा हा महत्वाचा नियम प्रस्तुत कज्जांत पाळलेला दिसत नाहीं. या कज्जांत कुंदा व मुकुंदा यांच्या प्रेमप्रकाराबद्दल कितीतरी उहापोह झालेला आहे. पण त्यातील बऱ्याचश्या गोष्टी गैरलागू आहेत. फौजदारी कज्जांत गुन्हां शाबीत करतांना त्या गुन्ह्यापाठीमागचा हेतु काय त्याबद्दलचा पुरावा ग्राह्य असतो, पण याबाबतींत असें लक्षांत ठेवणेंस पाहिजे कीं हेतु पुरेपूर शाबीत झाला, गुन्हा नाशाबीत झाला नाहीं तर आरोपीस निर्दोषी म्हणून सोडले पाहिजे. त्याच्या उलट हेतु अजिबात शाबीत झाला नाहीं व गुन्हा पुरेपूर शाबीत झाला तर आरोपीला दोषी ठरवून त्याला शिक्षा केली पाहिजे.

खालच्या कोर्टानें या कज्जांत गुन्ह्याच्या शाबीतीकरता कोणत्या मुद्यांची आवश्यकता आहे तें नीट पाहिलेलें दिसत नाहीं. या कज्जांत ज्या गोष्टीबद्दल वाद नाहीं अथवा ज्या गोष्टी पुरेपूर शाबीत झाल्या आहेत त्या अशा—

मुकुंदानें आपली आंगठी २५ रु. ला कुंदेला विकली, कुंदेनें १० रु. आगाऊ दिले व १५ रु. मागाहून देते असें म्हणून मुकुंदाकडून आंगठी घेतली. बाकीचे रुपये जेव्हा कुंदा देईना तेव्हां मुंकुदा तिच्या घरी गेला व त्यानें १५ रु. मागितले. कुंदेने १५ रु. देणेचे नाकारल्यावर मुकुंदानें तिच्याजवळ पडलेली आंगठी घेतली व तो आपल्या घरी आला. घरी येण्यापूर्वी तो कुंदेला म्हणाला कीं बाकीचे १५ रुपये देईपर्यन्त ही आंगठी मी तुला देणार नाहीं.''

अशा ह्या परिस्थितींत मुकुंदावर चोरीचा आरोप शाबीत होऊं शकत नाहीं. चोरीच्या गुन्ह्यामध्यें दुसऱ्याची वस्तु अप्रामाणिक हेतूनें आपल्याकडें घेतली पाहिजे. या कज्जांत अप्रामाणिक हेतू मानतां येत नसल्यामुळें मुकुंदावर चोरीचा गुन्हा शाबीत मानतां येणार नाहीं. शाबीत झालेल्या गोष्टीवरून हा कज्जा फौजदारी स्वरुपाचा नसून दिवाणी स्वरुपाचा आहे असेंच मानावे लागेल.

३२ मुंबई लॉ रिपोर्टर १ पान ११४० (बादशहा वि. सीताबाई) या कज्जांत प्रस्तुतच्या कज्जासारख्याच गोष्टी शाबीत झाल्या होत्या. त्या कज्जात खालच्या कोर्टानें आरोपीस चोरीच्या गुन्ह्याखाली दंड केला होता. पण हायकोर्टनें दंड माफ करून आरोपीस निर्दोषी म्हणून सोडून दिले. मुंबई हायकोर्टानें वरील कज्जांत सांगितलेले तत्व लक्षांत घेऊन या कज्जांतही असें मानावें लागेल कीं, मुकुंदावर चोरीचा गुन्हा शाबीत होत नसल्यामुळें त्याला निर्दोषी म्हणून सोडून दिले पाहिजे.

## सबब

असें फर्मावण्यांत येत आहे कीं, खालच्या कोर्टानें केलेली शिक्षा रद्द करणेंत आलेली आहे व मुकुंदाला निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आले आहे. आणखी असेंहि फर्माविण्यांत येत आहे कीं, मुकुंदानें दंड भरला असल्यास तो त्याला परत देण्यांत यावा.

[टीपः—३२ मुंबई लॉ रिपोर्टर ११४० बादशहा वि. सीताबाई हा कज्जा वाचनीय आहे.]

# २

# गाडी चालू असतां साखळी ओढणें

आरोपी पोपटलाल शहा हे तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतून प्रवास करीत होते. त्या डब्यांत फक्त ३० उतारूंसाठीं जागा होती परंतु ४५ उतारू त्या डब्यांत बसल्यामुळें सर्वांनाच गर्दीचा अत्यंत त्रास होऊं लागला. तो त्रास थांबविण्यासाठीं पोपटलालनें डब्यांतील साखळी ओढली व गाडी थांबविली. गाडी थांबल्यामुळें रेल्वेचे नोकर पोपटलालच्या डब्यापाशीं आले व साखळी ओढण्याचें कारण त्यांनीं विचारलें. डब्यांत फक्त ३० माणसांची जागा असतांना ४५ माणसें येऊन बसल्यामुळे सर्वांना त्रास होत आहे, सबब उतारूंची बसण्याची व्यवस्था दुसऱ्या डब्यांत करून त्रास दूर करण्यांत यावा, असें पोपटलालनें रेल्वेच्या नोकरांना सांगितलें. रेल्वेच्या नोकरांनी पोपटलाच्या तक्रारीकडे दुर्लक्ष केलें व गाडी चालू केली. पोपटलालनें पुन्हां साखळी ओढून गाडी थांबविली. गाडी पुन्हां थांबविल्यामुळें पहिल्या व दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत जे गोरे उतारू बसले होते, त्यांचे पित्त खवळलें व त्यांनीं पोपटलालला शिव्या दिल्या, एवढेंच नव्हें तर त्याला मारण्यासाठीं ते त्यांच्या अंगावर धावून आले. पोपटलाल स्वस्थ होता.

रेल्वेच्या नोकरांनी गोऱ्या उतारूंची समजूत घालून प्रकरण मिटवलें. शिव्या देणाऱ्या गोऱ्या उतारूंचीं नांवें पोपटलालनें रेल्वेच्या नोकरांपाशीं मागतली परंतु तीं नांवें त्याला सांगण्यांत आली नाहींत. पोपटलालच्या तक्रारीकडे लक्ष न देतां गाडी पुन्हां चालूं झाली. पोपटलालनें पुन्हां साखळी ओढून गाडी थांबविली. पोपटलालच्या हट्टामुळें रेल्वेचे नोकर जिद्दीस पेटले व डब्यांतील गर्दी कमी करण्याऐवजीं त्यांनीं पोपटलालवरच विनाकारण गाडी थांबविल्याबद्दल रेल्वे बाबतच्या कायद्याच्या क. १०८, १०९, व १२१ अन्वयें खटला भरला. खालच्या कोर्टानें पोपटलालला क. १०८ व १२१ अन्वयें दोषी ठरवून दंडाची व दंड न दिल्यास साध्या कैदेची शिक्षा दिली, म्हणून पोपटलालनें हें रिव्हिजन केलें होतें.

पोपटलालनें क. १०८ व १२१ अन्वयें गुन्हा केला आहे किंवा काय, हें आपल्याला ह्या रिव्हिजनमध्यें पहावयाचें आहे. पुरेसें कारण नसतांना साखळी ओढून गाडी थांबविणें हा क. १०८ अन्वयें गुन्हा आहे. साखळी ओढण्यास पुरेसें कारण होतें किंवा नाहीं, हे प्रत्येक मुकदम्याच्या हकिकतीवरून ठरवावयाचें असते. प्रस्तुतच्या मुकदम्याची हकीकत अशी आहे कीं, ज्या डब्यांत अधिकांत अधिक ३० उतारू बसूं शकतात अशा डब्यांत ४५ उतारू बसल्यामुळें डब्यांतील उतारूंना त्रास होऊं लागला व तो त्रास नाहींसा करण्यासाठीं डब्यांतील एका उतारूनें (पोपटलाल) साखळी ओढून गाडी थांबविली. प्रत्येक डब्यासाठीं उतारूंचा कमाल आकडा निश्चित करणें, हें रेल्वे बाबतच्या कायद्याच्या क. ६३ अन्वयें रेल्वेचें कर्तव्य असतें. तें कर्तव्य जर पाळण्यांत आलें नाहीं तर त्यासाठीं क. ९३ नें शिक्षा सांगितली आहे. डब्यांत अधिकांत अधिक जितके उतारू बसूं शकतात तितके उतारूं ज्या डब्यांत बसले आहेत त्या डब्यांत जाऊन बसण्याची सक्ति कोणताही रेल्वेचा नोकर कोणत्याही उतारूवर करूं शकत नाहीं. जो रेल्वेचा नोकर उतारूवर तशी सक्ति करील तो रेल्वेबाबतच्या कायद्याच्या क. १०२ अन्वयें शिक्षेस पात्र ठरतो. ह्यावरून आपल्यास असें दिसून येईल कीं, पोपटलालच्या डब्यांत अतोनात गर्दी झाली आहे हें दिसत असून व ती गर्दी कमी

करून सर्व उतारूंची सोय करणें हें आपलें कर्तव्य आहे, हें ठाऊक असूनहि रेल्वेच्या नोकरांनी पोपटलालला मुळींच मदत दिली नाहीं. अशा परिस्थितींत साखळी ओढण्यास पोपटलालला पुरेसें कारण नव्हतें, असें म्हणण्यास मुळींच जागा नाहीं. पुरेसें कारण होतें म्हणूनच त्याने साखळी ओढून गाडी थांबविली, हें अगदीं उघड आहे. शिव्या देणाऱ्या व मारण्यासाठीं अंगावर धावून येणाऱ्या गोऱ्या उतारुंची नांवें कळावीत म्हणूनहि आपण साखळी ओढली, असें पोपटलालचें म्हणणें आहे. साखळी ओढण्यासाठीं तें कारण पुरेसें आहे किंवा नाहीं हें पाहण्याची आपल्याला गरज नाहीं, कारण कीं मुख्यतः गर्दी कमी करण्यांत येऊन उतारूंची नीट बसण्याची व्यवस्था करण्यांत यावी ह्या उद्देशानें पोपटलालनें साखळी ओढली हें आपल्याला नाकबूल करतां येणार नाहीं. तें कारण आमच्या मतें पुरेसे आहे. सबब, पोपटलालनें विनाकारण साखळी ओढली असें सिद्ध होत नाहीं व म्हणून त्याला क. १०८ अन्वयें दोषी ठरवितां येत नाहीं.

जितक्या उतारूंची बसण्याची सोय डब्यांत होऊं शकते तितके उतारू ज्या डब्यांत बसले आहेत अशा डब्यांत जो उतारू जाऊन बसेल तो रेल्वेबाबतच्या कायद्याच्या क. १०९ अन्वयें शिक्षेस पात्र ठरतो. पोपटलाल डब्यांत जाऊन बसला त्यावेळीं डब्यांत किती उतारू होते ह्या विषयींचा पुरावा देण्यांत आलेला नाहीं. सबब जो डबा पूर्णपणें भरला आहे, अशा डब्यांत पोपटलाल जाऊन बसला असें ह्मणतां येत नाहीं व म्हणून त्यानें क. १०९ अन्वयें गुन्हा केला असेंहि म्हणतां येत नाहीं.

आतां आपण क. १२१ कडे वळूं. गाडी थांबवून रेल्वेच्या नोकरांना त्यांचें कर्तव्य बजावण्याचें कामांत अडथळा करणें हा क. १२१ अन्वयें गुन्हा आहे. गाडी थांबविण्यांत पोपटलालचा तसा उद्देश नव्हता. सबब त्याला क. १२१ अन्वये दोषी ठरवितां येत नाहीं.

**वरील कारणांस्तव आम्ही हा तपासणी अर्ज मंजूर करून आरोपीला ( पोपटलाल ) निर्दोषी ठरवून सोडून देतो.**

( १९३० ऑ. इं. रि. मुंबई १६० ) पोपटलाल शहा वि. सरकार.

# ३

# पत्नीवर चोरीचा आरोप

" स्वर्गाच्या बागेतल्या अथवा काल्पनिक साम्राज्यामधल्या सगळया स्त्रिया सुंदर असतील पण या ओबड धोबड जगात ज्या स्त्रिया नावारुपाला आल्य त्या कांहीं सगळया सुंदर नव्हत्या, ही साधी गोष्ट देखील हे विसरले आहेत."

सारगांवच्या न्यायपंचायतीच्या कोर्टांत विमल आपले लेखी म्हणणें वाचून दाखवीत होती.

तिच्यावर तिचा नवरा विजय यानें चोरीची फिर्याद केली होती.

गोष्ट अगदीं साधी होती परंतु नवराबायकोचे पटत नसल्यामुळें शेवटीं विजयने आपल्या बायकोवर चोरीची फिर्याद केली

विजयचें असें म्हणणें होते "लग्नाच्या वेळी मी आपल्या बायकोला नथ दिली होती ती नथ माझ्या कपाटांत होती पण विमलने माझी किल्ली घेऊन माझें कपाट उघडले व त्यांतील नथ काढून घेऊन, ती आपल्या माहेरी बापाकडे रहावयास गेली. तिचें माहेर याच गावांत म्हणजे सारगावांत आहे. मी येथेंच राहतो पण विमल-

मात्र मला सोडून माहेरी गेली आहे. जातांना तिने नथेची चोरी केली. या कामीं तिच्या बापानें तिला मदत केली आहे. आतां ती नथ तिच्या बापाचे ताब्यांत आहे. अशा परिस्थितींत विमल व तिचे वडील भगवानराव हें दोघे दोषी आहेत. व त्यांना कायद्याप्रमाणें होईल तितकें कडक शासन करावें असें माझे म्हणणे आहे.

विजयतर्फे सर्व पुरावा झाल्यानंतर विमलनें आपले म्हणणें लेखी वाचून दाखविले. त्यांत तिनें सर्व गोष्टींचा खुलासा केला. तिची कैफियत अशी होती—

" आपली बायको नक्षत्रासारखी सुंदर असावी, तिचे नाक चाफेकळी-प्रमाणें असावें, तिच्या भुवया धनुष्याकृति असाव्या, तिचा वर्ण केतकीसारखा गौर असावा, तिच्या गालाला खळी असावी, वगैरे किती तरी कल्पना लग्नापूर्वी यांच्या मनांत येत असत पण त्यांना जी बायको मिळाली तिचे रुप अगदी साधारण होतें, कर्तृत्वाच्या बाबतीत लोक माझी स्तुति करतात. आपल्या समाजांतील अनाथ महिला आणि पतित स्त्रिया यांना आश्रय देऊन त्यांचे रक्षण करणें आणि त्यांना बौद्धिक, नैतिक व औद्योगिक शिक्षण देऊन त्यांचे जीवन सुखी करणें हें संस्थेचें उद्दिष्ट ठेवून मी येथे नमुनेदार अनाथ महिलाश्रम सुरु केला आहे बाहेर-गांवचे किती तरी मोठमोठे लोक येथे येऊन माझी स्तुति करतात पण—

ह्यांच्या अपेक्षेप्रमाणें मी सुदर नसल्यामुळें ह्यांना व्हावें तसें सुख लागत नाहीं. माझ्याकडून शक्यतितकी खटपट करून ह्यांना सुखी करण्याचा प्रयत्न मी करते. पण माझें रुप माझ्या आड येतें. माझा वर्ण जर कमलपुष्पाप्रमाणें आरक्त गौर असता, चंद्राप्रमाणें माझें मुख मोहक असतें, माझे दांत हिरकणीप्रमाणें स्वच्छ व कुदाच्या कळ्याप्रमाणें बारिक नी सारखे असते, माझे ओठ पिकलेल्या तोंडल्या-प्रमाणें लाल असते, माझी मान विड्याची पिक दिसण्याइतकी गौर व पातळ त्वचेची असती—थोडक्यांत संस्कृत कवींनीं सौंदर्याच्या बाबतीत केलेल्या कल्पना माझ्याबाबतींत सार्थ ठरल्या असल्या तर माझी थोरवी ह्यांना आकलन करतां आली असती पण—

पण माझें रूप चांगलें नसल्यामुळें घरांत हे मला वाटेल तसें सारखे बोलूं लागलें व माझ्या घरांतून जा असें कितीदां तरी मला हे म्हणूं लागले. शेवटीं कंटाळून मी

माहेरी जाण्याचें ठरविले. जातांना आपली नथ बरोबर घेऊन जावी असा विचार करून ह्याच्या कपाटांत असलेली नथ त्यांच्याच किल्लीनें मी काढून घेतली व माझ्या माहेरी मी गेलें. ती नथ माझ्या वडिलांच्याकडे दिली. ह्यांच्या घरांतून गेल्यानंतर खरें म्हणजे ह्यांना सुख लाभावयास पाहिजे होते पण कुणीतरी बदसल्ला दिल्यामुळें ह्यांनी माझ्यावर व माझ्या वडिलांच्यावर चोरीची फिर्याद केली आहे.

झालेला प्रकार असा आहे. या कामीं मी दोषी असेन तर न्यायकोर्टानें मला जरूर शिक्षा द्यावी."

विमलच्या वडिलांनी विमलच्या म्हणण्याला अनुरूप अशीच लेखी कैफियत दिली.

सर्व पुरावा झाल्यावर न्यायपंचायतीनें जो ठराव दिला तो असा—

"**मध्यप्रांत वऱ्हाडच्या पंचायत कायद्यातील ६८ व्या कलमाप्रमाणें ही फिर्याद या कोर्टांत दाखल करण्यांत आली आहे. इंडियन पीनल कोडच्या ३७८ कलमामध्यें चोरीची व्याख्या दिली आहे. ती चोरीची व्याख्या पाहिली व या कज्जांतील पुरावा पाहिला म्हणजे असें दिसतें कीं, विमलनें तिच्या नवऱ्याची संमति नसतांना त्याच्या कपाटांतील नथ काढून घेतली व नथ घेऊन ती आपल्या माहेरी गेली.** ती नथ नवऱ्यानें तिला लग्नांत दिली होती याबद्दल वाद नाहीं. त्या नथेवर तिची मालकी नसून तिच्या नवऱ्याची मालकी आहे असेंच म्हणावें लागेल. **अशा ह्या परिस्थितींत विमलनें केलेलें कृत्य चोरीच्या गुन्ह्याखालीं येतें व ती ३७९ कलमाप्रमाणें दोषी आहे असें आम्हास वाटते. त्याचप्रमाणे तिचे वडील भवानराव हेहि चोरीच्या कलमाखालीं गुन्हेगार आहेत असें आम्हांस वाटते.** विमलचें म्हणणें ऐकून घेतलें म्हणजे असे वाटूं लागते कीं, विजयने तिच्यावर व तिच्या वडिलांच्यावर चोरीची फिर्याद केली नसती तर बरें झालें असते. पण हा प्रश्न कोर्टानें विचारांत घेण्याचा नाहीं. विमलला व तिच्या वडिलांना कडक शिक्षा न करतां सौम्य शिक्षा करावी असें आम्हांस वाटते व म्हणूनच विमल व भवानराव यांना प्रत्येकीं १० रुपये

दंडाची शिक्षा देतो. आम्हीं असेंहि फर्मावितो कीं, ज्या नथेबद्दल चोरी झाली क जी नथ कोर्टांत मुद्देमाल म्हणून आहे ती विजयला देण्यांत यावी."

हें काम जेव्हां वरच्या कोर्टांत गेलें तेव्हां नवीनच प्रकार झाला. वरच्या कोर्टांत विजयने आपली बाजू बदलली व झालेला प्रकार कोर्टांत कळावा म्हणून त्यानें आपलें लेखी म्हणणें कोर्टांत दाखल केलें. त्यानें त्यांत असें म्हटलें की— नाना प्रकारची संस्कृत पुस्तकें वाचून त्यांत स्त्रियांचें केलेलें वर्णन पाहून माझी पत्नी कशी असावी याबद्दल मी कांहीं कल्पना मनाशी बाळगल्या होत्या. एका पुस्तकांत नायिकेचें वर्णन करतांना असें म्हटलें होतें कीं—'पूर्वी शंकरानें रागानें लाल होऊन मदनाला भस्मसात केले, त्यावेळीं आसपासचे प्राणी भीतीनें त्या नायिकेडे पळत आले व तिनेहि त्यांना आश्रय दिला. शंकराच्या मस्तकावरील चंद्रानें तिचें मुख, शंकराच्या आसपास भ्रमण करणाऱ्या भ्रमरपंक्तीने तिचा केशसंभार, शंकराच्या हातांतील शंखाने तिची निमुळती मान, त्याच्या जवळच्या धनुष्यानें तिच्या भुवया, शंकराच्या आसपास गंगेमध्यें वावरणाऱ्या मत्स्यानें तिचे डोळे—याप्रमाणें प्रत्येकानें आपल्याला योग्य अशा स्थानांचा आश्रय घेतला'—हें वर्णन वाचून मला असें वाटत असें कीं, माझी पत्नी अशीच सुंदर असावी. पण माझी पत्नी विमल रूपाच्या बाबतींत अगदीच साधारण असल्यामुळें मला सारखें दुःख होऊं लागलें. लेखक म्हणून मी कितीतरी प्रसिद्ध झालों व मला कितीतरी बक्षिसें मिळाली पण माझी पत्नी सुंदर नसल्यामुळें मला सारखा मनस्ताप होत होता.

मी वरचेवर विमलला माझ्या घरांतून तूं बाहेर जा असें म्हणत होतो. तीहि कंटाळून माझें घर सोडून आपल्या माहेरी गेली. ती गेल्यावर लोक मलाच नांवें ठेवूं लागले व तिची स्तुति करूं लागले व तिच्याबद्दल सहानुभूति दाखवूं लागले. माझा मनस्ताप यामुळें फारच वाढूं लागला. शेवटीं मी एका मित्राच्या सल्लयानें विमलवर व तिच्या वडिलांच्यावर न्यायपंचायतीच्या कोर्टात, चोरीची फिर्याद केली. या कामीं त्या दोघांना दंड झाला, पण त्या निकालानंतर ज्या घटना घडल्या

त्यामुळें माझें मन बदलले आहे, मला आतां कळून आले आहे कीं, माझी पत्नी विमल ही कर्तृत्व, भावना व उपयुक्तता यांची मूर्तिमंत प्रतिमा असतांना तिची मातब्बरी न करतां मी सौंदर्याचा ध्यास घेतला व तिचा छळ केला. मला आतां इसापनीतीतील सांबराची गोष्ट आठवते. आपले प्रतिबिंब तळ्यांत पाहून त्या सांबराला वाटले कीं, आपलीं शिंगे किती सुंदर आहेत. पण पाय किती बेडौल आहेत! आपल्या पायांना शिव्या देत असतानांच त्या सांबराला पारध्यांची चाहूल ऐकूं आली व तें पळत सुटलें. कुरुप पायांनी आपलें काम बरोबर केलें पण सुंदर शिंगें एका झाडींत अडकल्यामुळें त्या बिचाऱ्या सांबराचा घात झाला. मला ही गोष्ट आठवून आता पश्चात्ताप होत आहे. विमलबद्दलच्या माझ्या कल्पना आतां बदलल्या आहेत. अशा परिस्थितींत मी केलेली चोरीची फिर्याद आपसांत निकालात काढण्याची परवानगी द्यावी व विमल आणि तिचे वडील याना न्यायपंचायतीने केलेला दंड रद्द करण्यांत यावा."

विजयचें हे म्हणणें वाचून वरच्या कोर्टाने जो निकाल दिला तो असा—

" सर्व प्रकार पाहून असें ह्मणावेसें वाटतें कीं, विजयनें फिर्याद केली नसती तर बरें झाले असते. खालच्या कोर्टात दंड झाल्यानंतर आता ह्या कोर्टात आपसांत करण्याबद्दल विजय परवानगी मागत आहे. **कायद्याचा असा नियम आहे कीं, चोरीची फिर्याद आपसांत करतां येत नाहीं अथवा आपसांत करण्याबद्दल परवानगी देतां येत नाहीं.**

अशा परिस्थितींत विमलनें आपल्या नवऱ्याच्या कपटांतून त्याच्या संमतिशिवाय नथ काढून घेतली असतांना तिचें कृत्य चोरी या सदराखालीं येतें कां हा प्रश्न निर्णित करणें भाग आहे.

नाथ कल्याण **( ८ मुंबई हायकोर्ट, फौजदारी कज्जे पान ११ )** यामध्यें असें म्हटलें आहे की, **" जर एखाद्या हिंदु स्त्रीनें आपल्या नवऱ्याच्या ताब्यांतून त्याच्या संमतिशिवाय आपलें स्त्रीधन काढून घेतलें तर तिच्यावर चोरीचा आरोप शाबीत होऊं शकत नाहीं.**

त्याचप्रमाणें ह्या कामीं तिला जर कोणी मदत केली असेल तर त्याच्यावरहि गुन्हा शाबीत होत नाहीं."

बादशहा वि. सत् नारायण, ५२ अलाहाबाद पान ४३७ यामध्यें म्हटलें आहे कीं, हिंदु स्त्रीला तिच्या नवऱ्यानें अगर इतर नातलगांनीं जे दागिने दिले असतील ते दागिने तिचें सौदायिक स्त्रीधन होतें. अशा मिळकतीवर तिचा संपूर्ण अधिकार असतो. असे दागिने नवऱ्याच्या संमतिशिवाय त्याच्या ताब्यांतून जर तिनें काढून घेतले तर तिच्यावर चोरीचा आरोप शाबीत होऊं शकत नाहीं. या कज्जांत आणखी असेंहि म्हटलें आहे कीं, कायद्याची माहिती नसल्यामुळें जर एखाद्या आरोपीने खालच्या कोर्टांत गुन्हा कबूल केला असेल तर वरच्या कोर्टांत त्याबद्दल विचार करता येईल.

वरील दोन कज्जे पाहिले म्हणजे असें दिसेल कीं विजयनें विमलला दिलेली नथ तिचें स्त्रीधन आहे व जरी तिनें नवऱ्याच्या ताब्यांतून त्याच्या संमतिशिवाय ती नथ काढून घेतली तरी तिच्यावर इं. पी. को. क्‍. ३७९ प्रमाणें चोरीचा आरोप शाबीत होऊं शकत नाहीं. तसेंच तिचे वडिल भवानराव यांच्यावरहि गुन्हा शाबीत होऊं शकत नाहीं.

## सबब

असें फर्मावण्यांत येत आहे कीं, खालच्या कोर्टानें दिलेला निकाल रद्द करण्यांत येऊन विमल व भवानराव यांना दोषमुक्त म्हणून सोडून देण्यांत येत आहे. खालच्या कोर्टानें हुकूम कल्याप्रमाणें त्यांनीं दंड दिला असेल तर तो दंड त्यांना परत देण्यांत यावा. आणखी असेंही फर्मावण्यांत येत आहे कीं, मुद्देमाल नथ विमलला देण्यांत यावी.

---

# ४

# सावकारी पाश

मानवी स्वभाव मोठा विचित्र असतो हेंच खरें. आपल्या गोष्टी तेवढ्या चांगल्या व दुसऱ्याच्या गोष्टी तेवढ्या वाईट असें एकीकडे मनुष्य म्हणत असतो. तर त्याचवेळीं त्याला वाटत असते कीं, अमुक अमुक माणसाला अमुक अमुक गोष्टी थोडक्या त्रासांत मिळाल्या, मला मात्र त्याबद्दल कितीतरी काबाडकष्ट करावें लागतात. जीवनाच्या बाजारांत इतरांचे सौदे सुरेख जमले, माझ्या योग्यतेप्रमाणें माझा सौदा मात्र जमला नाहीं असें प्रत्येक माणसाला वाटत असते. एकीकडे मनुष्य अहंभाव दाखवीत असतो. पण या अहंभावाची मागील बाजू असंतोषाची असते.

गदाधर सावकारानें न्यायपंचायतींत जे दावे दाखल केले होते, त्याबद्दल विचार करतांना न्यायपंचायतीनें मनुष्यस्वभावाच्या या विचित्र प्रकाराबद्दल बरीच चर्चा केली होती. ती चर्चा पाहून न्यायपंचायतीच्या सभासदाबद्दल कोणालाहि आदर वाटला असता.

तसेंच पाहिले असता गदाधराला खोट्याचा आश्रय करण्याचें कांहींच कारण नव्हतें. गावांतल्या एका कोपऱ्यावर त्याचा एक टुमदार बंगला होता. भरपूर पैसा, दारांत मोटार, घरांत नोकरचाकर वगैरे गोष्टी पाहून लोकांना गदाधराबद्दल हेवा वाटे. पण गदाधराच्या मनांत केव्हां केव्हां असे विचार येत असत कीं—

" अमुक अमुक सावकार कुळाला पैसे देतो. पण दुपटीचें किंवा तिपटीचें कागद करून घेतो, व व्याजही भरमसाट लावतो. त्याला मिळणारा फायदा पाहिला व त्या फायद्याची माझ्या फायद्याबरोबर तुलना केली ह्मणजे असें वाटतें कीं, कोणीकडे इंद्राचा ऐरावत व कोणीकडे शामभटाची तट्टाणी "

असल्या विचाराने गदाधर दु:खी असतांना त्याच्याकडे ग्यानबा व त्याचें चार भाऊबंद पैसे मागण्याकरितां आले. या पांच भाऊबंदांची एक समाईक जमीन होती. त्यांमध्यें सुधारणा करण्याकरितां त्यांना कांहीं कर्ज पाहिजे होते. गदाधरचा दिवाणजी सालस होता. त्यानें आजपर्यन्त खोटा व्यवहार कधींच केला नव्हता. दिवाणजीची व ग्यानबाची भाषा झाली आणि त्यांत शेवटीं असें ठरलें कीं, ग्यानबा व त्याचें चार भाऊबंद यांनी प्रत्येकीं शंभर रुपयाच्या प्रॉमिसरी नोटा लिहून द्यावयाच्या व प्रत्येकांस १०० रुपये द्यावयाचें.

असें ठरल्यानंतर पांच नोटा लिहिण्यांत आल्या व त्याना तिकिटे लावून ग्यानबा व त्याचें चार भाऊ यांनीं आपल्या सह्या केल्या.

इतक्यांत गदाधर सावकार राहत असलेल्या समोरच्या घराला एकदम आग लागली व जिकडे तिकडे धांवपळ नि पळापळ सुरू झाली. ग्यानबा व त्याचें भाऊबंद हेही आग विझविण्याकरितां तिकडे पळत गेले.

आग विझविण्यांत आली तेव्हां बरींच रात्र झाली होती. दिवाणजी ग्यानबाला व त्याच्या भाऊबंदांना म्हणाला कीं, उद्यां येऊन पैसे घेऊन जा. त्याच्या शब्दावर विश्वास ठेऊन, ग्यानबा व त्याचें भाऊबंद घराकडे निघून गेले. दुसरें दिवशीं जेव्हां ते सावकाराच्या घरीं गेले तेव्हां त्यांना निराळाच प्रकार दिसला. गदाधरानें आपल्या दिवाणजीला कामावरून काढून टाकले होते.

ग्यानबा गदाधराकडे पैसे मागूं लागला, पण गदाधर पैसे देण्यास कबूल होईना. आपल्याकडून नोटा दिवाणजीनें लिहून घेतल्या आहेत, त्या तरी द्या असें जेव्हां ग्यानबा व त्याचें भाऊबंद म्हणूं लागले तेव्हां गदाधरानें 'रामा शिवा गोविंदा' असें म्हणून कानांवर हात ठेवलें.

सारा प्रकार मोठा विचित्र आणि चमत्कारिक होता.

दुसरें दिवशीं ग्यानबा व त्याचें भाऊबंद यांनीं सावकाराला नोटिसा केल्या पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. पुढें अडीच वर्षांनीं गदाधरानें ग्यानबा व त्याचे भाऊबंद यांच्यावर पांच प्रॉमिसरी नोटेवरून पांच दावे न्यायपंचायतींत दाखल केलें. या दाव्यामध्यें गदाधरानें व्याजाची अजीबात सूट दिली होती त्यानें प्रत्येकांवर फक्त शंभर रुपयाचा दावा केला होता.

हा प्रकार पाहून एखाद्याला वाटले असतें कीं, गदाधर किती सज्जन सावकार आहे ! व्याज घेणें म्हणजे निमकहरामाचें काम आहे असें त्यास वाटत असावे. स्मृतिकारांनीं उपमा देऊन असें म्हटलें आहे कीं, ब्रह्महत्या करणारा माणूस एका ताजव्यांत घातला व व्याज घेणारा मनुष्य दुसऱ्या ताजव्यांत घातला तर व्याज घेणाऱ्या मनुष्याचा ताजवा खाली जाईल. स्मृतिकारांचा उपदेश कदाचित् गदाधरास पटला असेल व म्हणूनच त्यानें व्याज सोडलें असेल असें कांहीं लोक म्हणूं लागले. पण अंदरकी बात कांहीं निराळींच होती.

मध्यप्रांत व वऱ्हाडच्या कायद्यामध्यें जें ८६ वे कलम आहे, त्यामध्यें असें म्हटलें आहे कीं न्यायपंचायतीला शंभर रुपयावरचें दावे चालविण्याचा अधिकार नाहीं.

गदाधराला असें वाटे कीं, जर आपण मुन्सफ कोर्टात दावा दाखल केला तर कदाचित् आपला खोटा व्यवहार उघडकीस येईल अशा परिस्थितींत व्याजाची अजिबात सूट देऊन ग्यानबा व त्याचें चार भाऊबंद यांच्यावर प्रत्येक शंभर रुपयाचा दावा न्यायपंचायतीकडे दाखल केला तर आपला खोटा व्यवहार उघडकीस येणार नाहीं. त्याला असेंही वाटत होते कीं, न्यायपंचायतीच्या सभासदांना एकदां मोटारींतून हिंडवून आणले म्हणजे आपल्या विरुद्ध न्याय देण्याची त्यांची काय बिशाद लागली आहे ?

अशा समजुतीनें जेव्हां गदाधरानें न्यायपंचायतींत दावें दाखल केले, तेव्हां त्याला निराळाच अनुभव आला. वशीलेबाजीपासून पूर्ण अलिप्त व प्रामाणिक न्याय

करण्याची मनापासून धडपड असे न्यायपंचायतींत सभासद होते. गदाधराचा बंगला, त्याची मोटार, त्याची श्रीमंती वगैरे गोष्टींचा न्यायपंचायतीच्या सभासदांवर कांहींच परिणाम होत नाहीं असें जेव्हां त्याला कळून आले तेंव्हां एखादा भूकंपाचा धक्का बसावा अशी त्याच्या मनाची स्थिती झाली. गदाधरानें आतांपर्यंत खोटे व्यवहार केले नव्हते. हाच त्याचा पहिला खोटा व्यवहार होता. पण तो एक खोटा व्यवहार पचविण्याकरितां त्याला कितीतरी खोट्या गोष्टी कराव्या लागल्या.

नोटा ( कर्जाचा कागद ) गदाधराच्या घरांत लिहिण्यांत आल्या होत्या, पण गदाधरानें आपल्या साक्षींत सांगितले कीं, आपण स्वतः पैसे घेऊन ग्यानबाच्या मळ्यांत गेलो तेथें त्याच्या वस्तीवर ग्यानबा व त्याचें भाऊबंद यांच्याकडून पांच नोटा लिहून घेतल्या व त्यांना पांचशे रुपये दिले. त्यानें असेंही सांगितले कीं, त्या वस्तीचें आसपास पांचसहा मोठी आंब्याची झाडें होती.

पंचायत कायद्यांतील ११३ व्या कलमाप्रमाणें जागा पाहण्याचा अधिकार न्यायपंचायतीला दिलेला आहे. खरा न्याय व्हावा या बुद्धीनें न्यायपंचायतीच्या सभासदांनीं ग्यानबाचा मळा पाहण्याचें ठरविले. ती जागा पाहिल्यावर त्यांना असें दिसून आले कीं, आंब्याची झाडें वगैरेबद्दल जो मजकूर गदाधरानें आपल्या साक्षींत सांगितला तो धादांत खोटा आहे.

गदाधराचें जमाखर्च पाहण्यांत आले, तेव्हां प्रस्तुत व्यवहाराबद्दल कांहींतरी घोटाळा आहे, असें न्यायपंचायतीच्या सभासदांना समजून आले. ज्या दिवाणजीला गदाधरानें कामावरून काढून टाकले होते, त्याची साक्ष जेव्हां घेण्यांत आली तेव्हां झालेला प्रकार त्यानें सांगितला व गदाधरानें असें कां केले असले पाहिजे ह्याचें अचुक वर्णन त्यानें केलें.

न्यायपंचायतीच्या सभासदांनीं सर्व पुरावा लक्षांत घेऊन जो निवाडा दिला तो अत्यंत निःपक्षपातीपणें व मनुष्य स्वभावाची नीट पारख करून दिला.

इसापनीतींत आंबट द्राक्षाबद्दल एक गोष्ट आहे. त्या गोष्टींत एक कोल्हा द्राक्षाच्या वेलीजवळ जातो व उड्या मारुन मारुन जेव्हां त्याला द्राक्षें मिळत

नाहींत, तेव्हां अखेर तो म्हणतो कीं, "द्राक्षें आंबट आहेत! असली द्राक्षें मला काय करावयाची?" मनुष्य स्वभावाची ही एक बाजू झाली. त्याची दुसरी बाजू अशी कीं एक कोल्हा द्राक्षे खात होता, तो खात असलेली द्राक्षे चांगली होती. त्याच्यापासून दूर अंतरावर असणारी द्राक्षें वस्तुतः तितकी चांगली नव्हती. पण त्या खुळ्या कोल्ह्यास वाटत होतें कीं आपण खात असलेल्या द्राक्षांपेक्षां ती दूर असणारी द्राक्षें फार गोड आहेत. असल्या समजुतीमुळें गोड द्राक्षें खाणाऱ्या त्या कोल्ह्याचाच चेहरा आंबट दिसत होता.

गदाधराचा स्वभाव या दुसऱ्या कोल्ह्याप्रमाणें झाला होता. सरळ सालस सच्ची सावकारी करून त्याच्या वाटेला कितीतरी सुखें आली होती. पण त्याला असें वाटत होते कीं खोटी सावकारी करणाऱ्यांच्या वाटेला जी सुखें आली आहेत तीं आपल्यापेक्षां कितीतरी मोठी. असल्या समजुतीमुळें तो स्वतः दुःखीकष्टी झाला व यावर उपाय म्हणून प्रस्तुतचा खोटा व्यवहार केला.

न्यायपंचायतीच्या सभासदांनीं सर्व पुरावा बारकाईनें पाहिला, मनुष्य स्वभावाचें सुंदर आकलन केले व गदाधराच्या कज्ज्यामध्यें फारच उत्कृष्ट निवाडा दिला. त्यानी गदाधराचें पांचही दावे रद्द केले व नुकसानभरपाई म्हणून ग्यानबा व त्याचें चार भाऊबंद यांना प्रत्येकीं १०/१० रुपये नुकसानी द्यावी असें ठरविले पंचायत कायद्याच्या ९४ ह्या कलमामध्यें वादीनें जर खोटा दावा केला असेल तर प्रतिवादीला १० रुपयेपर्यन्त नुकसानभरपाई देण्याचा अधिकार न्यायपंचायतीस दिला आहे. त्या कलमाचा आधार घेऊन न्यायपंचायतीनें नुकसानभरपाईचा हुकूम दिला होता.

न्यायपंचायतीचा हा निकाल पाहून गांवच्या लोकांना न्यायपंचायतीबद्दल कितीतरी अभिमान वाटूं लागला. ते म्हणूं लागले,

"कायदा गाढव आहे. न्यायालयांत मिळणारा न्याय आंधळा असतो, देवाची शपथ खरें सांगेन असें म्हणून कोर्टांत सुरू केलेले बोलणे सवरणे म्हणजे सत्यप्रकार व सत्यपरिस्थिती लपविण्याकरितां तोंडास फासलेली रंगसफेदी असते,

असें आपण आजपर्यंत समजत होतो. आपण असेंहि म्हणत होतो कीं, शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावे हें ज्याप्रमाणें व्याकरण शिकल्यानें समजते, त्याप्रमाणें कायदा कसा गाढव आहे व न्याय कसा आंधळा आहे हें कोर्टाची पायरी चढल्यानें समजते. पण आपल्या या समजुती आज चुकीच्या ठरल्या आहेत. आज न्यायपंचायतीनें दिलेला न्याय पाहिला म्हणजे खरोखर असें वाटते हा दैवी न्याय आहे."

न्यायपंचायतीच्या निकालावर गंगाधरनें वरच्या कोर्टांत अर्ज केला.

वरच्या कोर्टानें न्यायपंचायतीच्या निकालाची फारच तारीफ केली व आपण त्या निवाड्याशीं पूर्ण सहमत आहे, असें म्हणून हुकूम केला कीं,

**"सबब खालच्या कोर्टाचा हुकूम कायम करणेंत येत आहे. हा अर्ज खर्चासुद्धां रद्द करणेंत येत आहे."**

---

# ८

# कोर्टांत फक्त सदरा टोपी घालून आल्याबद्दल असेसरला दंड

सेशन्स कोर्टांत एक खुनाचा खटला चालू होता. त्या खटल्यांत असेसर ह्या नात्यानें काम करण्यासाठी छगनलालला बोलावण्यांत आलें होतें. छगनलाल केवळ एक सदरा, टोपी व गळपट्टा असा पोषाख करून कोर्टांत गेला. त्यानें कोट घातला नाहीं. तो पोषाख अयोग्य आहे, असें सेशन्स जज्जचें मत पडलें. अयोग्य पोषाख करून कोर्टांत आल्याबद्दल सेशन्स जज्जनें छगनलालला ३ रुपये दंड केला. त्यावर छगनलालनें हा तपासणी अर्ज केला होता.

छगनलालला करण्यांत आलेल्या दंडास कायद्याचा आधार आहे किंवा नाहीं, हें आपल्याला ह्या तपासणींत पहावयाचें आहे. छगनलालला दंड करण्यासाठीं सेशन्स जज्जनें दिलेलें मुख्य कारण असें आहे कीं, प्रत्येक असेसरनें कोट घालून आलें पाहिजे; कोट घालून जो असेसर आला नसेल त्यानें योग्य तऱ्हेचा पोषाख केला नाहीं असें म्हटलें पाहिजे. सेशन्स जज्जनें दिलेलें हें कारण आम्हाला

हास्यापद वाटतें. असेसरचा पोषाख कसा असावा ह्या संबंधीचे नियम उपलब्ध नाहींत. त्याचा अर्थ असा की, स्वतःच्या मर्जीनुरुप पोषाख करण्याचा हक्क प्रत्येक असेसरला आहे. दुसरे असे कीं, छगनलालनें ज्या तऱ्हेचा सदरा घातला होता त्या तऱ्हेचा सदरा कोटाशिवायच चांगला दिसतो. त्या सदऱ्यावर जर कोट घातला तर त्या सदऱ्याची शोभा नाहींशी होते. छगनलालचा पोषाख योग्य होता कीं अयोग्य होता हा प्रश्न बाजूला सारून त्याला त्याबाबत दंड करण्याचा अधिकार सेशन्स जज्जला होता किंवा काय हें आपल्याला ह्या तपासणीमध्यें ठरवावयाचे आहे. सरकारी वकीलानें दोन कलमांचा आधार दाखविला आहे. एक पीनल कोडचें क. २२८ व दुसरें क्रि. प्रो. कोडचें क. ४८० कोर्टाचा अपमान करणाऱ्या इसमास दंडाची अथवा कैदेची शिक्षा देण्याचा अधिकार त्या दोन कलमान्वये कोर्टांना देण्यांत आलेला आहे. बुद्धिपुरःसर कोर्टाचा अपमान करण्यांत आला असेल तरच ती दोन्हीं कलमें लागू पडतील हें सहज समजण्या-सारखे आहे. सबब छगनलालनें कोर्टाचा बुद्धिपुरःसर अपमान केला किंवा काय, हें आपल्याला पाहिलें पाहिजे. सेशन्स जज्जनें छगनलालची जबानी लिहून घेतली आहे. त्या जबानींत त्यानें असें म्हटलें आहे कीं, जे कपडे घालून तो त्या दिवशीं कोर्टांत आला होता तेच त्याच्यापाशीं मौल्यवान असे कपडे होते. कार्यप्रसंगाच्या वेळीहि तो तेच कपडे घालीत होता व पूर्वी ज्या ज्या वेळीं असेसर ह्या नात्यानें त्याला काम करावें लागलें त्यावेळीहि त्यानें तेच कपडे घातले होते छगनलालनें दिलेली ही जबानी खोटी करण्याचें कांहींच कारण नाही. ती जबानी खरी आहे असें म्हणणें म्हणजेच तो स्वतःच्या दृष्टीनें उत्तम पोषाख करून आला होता. असें ठरविणें होय. सबब अयोग्य पोषाखांत कोर्टात येऊन छगनलालने कोर्टाच अपमान केला असें म्हणण्यास मुळींच आधार नाहीं. बुद्धिपुरःसर कोर्टाचा अप-मान करावा ह्या उद्देशानें छगनलाल तसा पोषाख करून आला होता, असें तर मुळींच म्हणतां येत नाहीं. कोर्टाचा अपमान झाल्याखेरीज पीनल कोडच्या क. २८८ चा व क्रि. प्रो. कोडच्या क. ४८० चा आधार कोर्टाला घेतां येत नाहीं, असें

आपण वर पाहिलेंच आहे. छगनलालनें कोर्टाचा अपमान केला नाहीं, असें आपण ठरविलेंच आहे, सबब त्या दोहोपैकीं एकहि कलमान्वये छगनलालला दंड करण्याचा अधिकार सेशन्स जज्जला नव्हता, हें देखील अगदी स्पष्ट आहे. ज्या अन्वये छगनलालला दंड होऊं शकतो, असें दुसरें कोणतेंहि कलम उपलब्ध नाही. त्या सर्व विवेचनावरून असा निष्कर्ष निघतो कीं, छगनलालला देण्यांत आलेल्या शिक्षेस कायद्याचा मुळींच आधार नसल्यामुळें ती बेकायदेशीर ठरते व म्हणून ती रद्द करणें आम्हास भाग आहे. **सबब आम्ही हा तपासणी अर्ज मंजूर करून सेशन्स जज्जनें दिलेला दंडाबाबतचा हुकूम रद्द करतों.**

(१९३३ ऑ. इं. रि. मुंबई पान ४७८ छगनलाल वि. सरकार)

---

# ६

# ‘शिव्या देणें, गुन्हा केव्हां होतो ?’

पिंपळगांवच्या न्यायपंचायतीपुढें चाललेल्या धोंडीराम विरुद्ध गंगाराम या खटल्याबाबतींत लोकांना अतिशय उत्सुकता वाटत होती. त्या खटल्याची हकीकत अशी होती—

धोंडीराम व गंगाराम दोघेहि पिंपळगांवचें रहाणारें. गंगाराम एक मोठा सार्वजनिक कार्यकर्ता होता व त्या निमित्तानें वर्षातून १०–११ महिने तो पिंपळबाहेर असे. त्याचे एकदां पिंपळगांवांत सार्वजनिक व्याख्यान झालें. व्याख्यानाचें दुसरें दिवशीं धोंडीराम त्याच्या घरीं गेला त्यावेळी दोघांची कांहीं बोलाचाली झाली. ती बोलाचाली ऐकून गांवातील बरीच मंडळी जमली व दुसरें दिवशीं धोंडीरामनें गंगारामवर न्यायपंचायतीचें कोर्टांत इं. पि. को. क. ५०४ प्रमाणें फिर्याद केली.

धोंडीरामचें असें म्हणणें होतें कीं, आपण गंगारामचें घरीं गेलों असतांना गंगाराम संतापला. त्या संतापाचें भरांत त्यानें आपल्याला शिव्या दिल्या व धाकहि दाखविला. त्याच्या त्या कृत्यानें आपला अपमान झाला, व शांतताभंगाची शक्यता निर्माण झाली. अशा परिस्थितींत गंगारामला इं. पि. को. क. ५०४ प्रमाणें दोषी ठरवून योग्य ती शिक्षा देण्यांत यावी.

गंगारामचें म्हणणें असें होतें कीं, धोंडीरामनें केलेली फिर्याद धादांत खोटी असून त्याच्या म्हणण्याप्रमाणें आपण त्याला शिव्या दिल्या नाहींत. किंवा त्याचा अपमान केला नाहीं.

सर्व पुरावा विचारांत घेऊन न्यायपंचायतीनें पुढील प्रमाणें निकाल दिला.

एखाद्या इसमाचा अपमान करण्याच्या उद्देशानें त्यास सहेतूक शिव्या देणें हा पिनल कोडाच्या कलम ५०४ अन्वयें गुन्हा आहे. ग्रामपंचायत कायदा कलम ६८ प्रमाणें दिवाणी व फौजदारी खटले चालविण्याचा अधिकार न्यायपंचायतीला देण्यांत आला आहे. ज्या गुन्ह्याबाबतचें खटले न्यायपंचायतींना चालवितां येतात, त्यामध्यें पीनल कोडाच्या ५०४ कलमाचा समावेश करण्यांत आला आहे.

प्रस्तुत कज्ज्यांत आपणापुढें जो प्रश्न आहे तो असा कीं, गंगरामनें ४०५ कलमाप्रमाणें गुन्हा केला आहे अगर नाहीं. गुन्ह्याचें आदले दिवशीं गंगारामनें जे सार्वजनिक भाषण केलें तेंच ह्या गुन्ह्यास कारणीभूत आहे, असें फिर्यादीतर्फे सांगण्यांत आले आहे. ते भाषण अत्यंत महत्वाचें आहे. त्या भाषणामध्यें गंगारामनें असें म्हटले होते—

"आपणास आतां स्वराज्य मिळाले आहे. आतां आपण खेड्याची स्थिती सुधारण्याकरतां व ग्राम-पुनर्घटना करण्याकरितां जास्तींत जास्त प्रयत्न केले पाहिजेत. आपल्या भारत देशांत सुमारें ५ लक्ष खेडीं असून प्रत्येक खेड्याची सरासरी लोकसंख्या ५०० आहे. १९१७ पूर्वी रशियाची ग्रामीण परिस्थिती हिंदुस्तानहून फारशी भिन्न नव्हती परंतु ग्राम-पुनर्घटनेची जी योजना अंमलांत आणून रशियानें पराकाष्ठेची क्रांती केली आहे, ती योजना भारतातील ग्रामपंचायतीच्या पुनरुद्धारासाठीं खास मार्गदर्शक होईल. हिंदुस्तानाच्या इतिहासाकडे नजर दिली म्हणजे असें दिसतें कीं, प्राचीन काळीं राज्यशकटाची मध्यवर्ती राजा व खेड्यांतून चालणारा कारभार अशी दोन चाके असत. जेव्हां आपला अधःपात सुरू झाला तेव्हांपासून मध्यवर्ती सत्तेचें चाक वाढूं लागले व दुसरें खेड्यांतले चाक झिजून झिजून विस्कळित झाले व मोडून पडलें. देशाचें राज्य म्हणजे एक वृक्ष आहे अशीं आपण कल्पना केली तर ग्रामसंस्था ह्या त्याच्या मुळया, मध्यवर्ती राज्ययंत्र

हे त्याचें खोड व प्रांतोप्रांती भिन्न भिन्न कामें करणारे लोक ह्या त्याच्या शाखा होत. आपण असें लक्षांत ठेवा की, लोकशाही राज्यकारभाराचा पाया शेतकरी आणि खेडें हा आहे. खेड्यांतील लोकांना राजकारणाचे धडे गिरविण्यास त्यांचे हातीं ग्रामपंचायतीची धुळपाटी दिली पाहिजे, यासाठीं खेडेगांवच्या लोकांनीं जास्तींत जास्त खटपट केली पाहिजे, पण या बाबतीत खेड्यामध्यें बरीच अनास्था दिसते. जिकडे तिकडें स्वार्थाला ऊत आला आहे. पंचायत म्हणजे 'पंचाईत' असें लोक म्हणूं लागले आहेत "...अशा तऱ्हेनें गंगारामचें भाषण पाहिले म्हणजे असें वाटूं लागते की, गंगाराम हा आपल्या खेड्याची व खेड्यांतील कांही पुढारी लोकांची नालस्ती करीत आहे.

याच भावनेनें धोंडीराम दुसरें दिवशी गंगारामचे घरीं गेला. त्यावेळीं दोघांच्या मध्यें बरीच बोलाचाली झाली. त्यावेळीं गंगारामनें धोंडीरामचा अपमान करण्याकरतां खूप खूप शिव्या व त्याला धाकहि दिला. सर्व पुरावा पाहून व गंगारामनें जें सार्वजनिक भाषण केले होतें तेही विचारांत घेतां अशी आमची खात्री झाली आहे कीं, गंगाराम बराच विद्वान आहे. पण आपल्या विद्वतेचा उपयोग त्याने आपल्याच खेड्यांतील लोकांना नांवें ठेवण्यांत केला आहे. इतकेंच करुन तो थांबला नाहीं तर दुसरें दिवशीं धोंडीराम जेव्हां त्याच्या घराकडे गेला व त्यानें त्याला अशा तऱ्हेचें भाषण पुन्हां न करण्याबद्दल सांगितले तेव्हा गंगारामनें धोंडीरामचा अपमान करून तेथें जमलेल्या शेकडों लोकांदेखत त्याला वाटेल त्या अद्वातद्वा शिव्या दिल्या. अशा तऱ्हेचें कृत्य गंगारामसारख्या विद्वान माणसानें करावयास नको होते. पण ज्याअर्थी त्यानें जाणून बुजून केलें आहे त्याअर्थी त्यानें इं. पी. को. क. ५०४ प्रमाणें गुन्हा केला आहे असें आम्ही ठरवितो व त्यास २५ रुपये दंडाची शिक्षा देतो.

ग्रामपंचायतीच्या कलम ८३ प्रमाणें जेव्हां हें काम वरच्या कोर्टांत गेले तेव्हां वरच्या कोर्टानें ग्रामपंचायतीस उपयुक्त होईल असा एक विस्तृत ठराव दिला. त्या ठरावांत असें म्हटलें होते कीं—

" प्रस्तुत कज्जांत गंगाराम दोषी ठरावा हा खरोखरी अन्याय आहे. खालच्या कोर्टानें गंगारामच्या भाषणावर बराच जोर दिला आहे व त्यावरून कांहीं तर्क केले आहेत. गंगारामचें जें भाषण पुराव्यांत दाखल झाले आहे, ते समग्र पाहिले असतां जशा तऱ्हेचे तर्क करणें वस्तुस्थितीला सोडून आहे. खालच्या कोर्टानें आपल्या ठरावांत भाषणाचा फक्त कांहीं भाग घेतला आहे. जो भाग विचारांत घेण्यांत आला नाहीं तो फारच महत्वाचा आहे. गंगारामनें आपल्या भाषणांत असें म्हटलें होते कीं—

स्वराज्य मिळून बरेच दिवस झाले पण ते अजून खेड्यापर्यंत येऊन पोंचले नाहीं. लोक म्हणतात स्वराज्य मिळाले. पण त्यानें खेड्याचे लोकांचा काय फायदा झाला ? मी म्हणतों—

दूर कोठेंतरी पाऊस पडून तेथें आलेला पूर आपल्या गांवच्या नदीला यावयास कितीतरी वेळ लागतो कीं नाहीं ? त्याप्रमाणें दिल्लीला मिळालेलें स्वराज्य खेड्यापर्यंत येऊन पोंचायला कांहीं दिवस लागणारच ...... खेड्यामध्यें उत्तम ग्रामपंचायत चालूं लागून त्यायोगें बनणारे खेड्यांचें स्वराज्य हेंच खरें स्वराज्य आहे. ते चालविणारांची नांवें इतिहासांत सांपडणार नाहींत. देवळाचें शिखर सर्वांना दिसते पण पाया दिसत नाहीं. खेड्यांचे स्वराज्य पायासारखें आहे. पंचायतीचें राज्य हेंच आम्हां भारतवासीय लोकांचें वैशिष्ट्य होतें. नादीरशहा, तैमूरलंग वगैरे सारख्यांच्या स्वाऱ्या आल्या आणि गेल्या. मोठमोठी राज्यें आली आणि गेली परंतु भारतवर्षात जोपर्यंत खेड्यापाड्यांतून पंचायती राज्य चाललें होतें, तोंपर्यंत आपले फारसे नुकसान झालें नाहीं. आपल्या हालअपेष्टांना सुरवात झाली ती पंचायत राज्य ढांसळल्यापासून..... आतां मनु पालटत आहे.

खेड्यांतील लोकांच्या हातांत सत्ता येत आहे. पण आपण असें लक्षांत वा कीं, सत्तेबरोबर नम्रता पाहिजे. नम्रता नसेल तर बिनब्रेकच्या गाडीप्रमाणें त्ता केव्हां अधःपात करील याचा नेम नाहीं. ग्रामपंचायतीच्या लोकांनीं अशी नाशी खूणगांठ बांधिली पाहिजे कीं, आपण अधिकारी नसून सेवक आहोत. ंचलोक जेव्हां एकमतानें बोलतात तेव्हां त्यांच्या मुखानें परमेश्वर बोलतो असें

गांवचे लोक मानतात. म्हणून ' पांचामुखी परमेश्वर ' ही म्हण पडली आहे. या म्हणीतील परमेश्वराला कमीपणा येईल असें वर्तन आपण करतां कामा नये...... पाश्चात्य लोकांनीं जे न्यायदेवतेचें चित्र काढलें आहे त्यांत एक आंधळी बाई हातामध्यें ताजव्याची दांडी समतोल धरून न्याय तोलीत आहे असें दाखविलें आहे. न्याय देणारी बाई कां ? तर स्त्रीच्या ठिकाणी असणारा दयाभाग न्यायदानामध्यें असावा असा उद्देश आहे. मला जर न्यायदेवतेचें चित्र काढणेंस सांगितलें तर बाईच्या ऐवजी देवता दाखवीन व ती आंधळी न दाखवितां चांगली डोळस दाखवीन. हेंच चित्र भारत वर्षातील पूर्वीच्या ग्रामपंचायतीबद्दल काढावें लागेल. आज मात्र प्रकार निराळा झाला आहे. आपणाला स्वातंत्र्य मिळाले आहे. पण स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हें ही गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे. काळया-बाजाराला अगर वशिलेबाजीला अगर गावगुंडीला कायद्यानें बिलकूल मान्यता दिली नाहीं परंतु हे सगळे प्रकार जोरात चालू आहेत. याचें कारण कीं स्वार्थवृत्ती कायद्याच्या पुढे धावत असते. उंटाला वाटले कीं माणसानें आपल्या पाठीवर बसूं नये, म्हणून त्यानें देवाला आपलें शरीर आष्टावक्र करावयास सांगितले तरी देखील त्यावर बसण्याची सोय माणसानें केलीच. आज जिकडे तिकडे स्वार्थवृत्ति वाढल्यामुळें स्वराज्याचें सुराज्य होण्यास हरकत आली आहे. कांहीं लोक पंचायतराज्य बघून म्हणतात कीं, ही पंचायत नसून 'पंचाईत' आहे. पंचाईत याचा अर्थ अडचण 'कटकट' असा आहे. अशा तऱ्हेचा प्रकार लोकांनीं बिलकूल होऊं देऊं नये व स्वार्थापेक्षां परार्थाला जास्त किंमत देऊन त्या राज्याचें सुराज्य करण्यास प्रत्येकानें काया, वाचा मनें करून झटले पाहिजे.''

" गंगारामचें अशा तऱ्हेचें भाषण वाचलें म्हणजे खालच्या कोर्टानें जी अनुमानें काढली आहेत ती चुकीची वाटतात. इतकेंच नव्हे तर असेंहि वाटूं लागते कीं, गंगारामसारख्या विद्वान् माणसावर धोंडीरामसारख्या कांहीं स्वार्थसाधू लोकांनीं कांहींतरी बालंट वा कुंभाड रचलें आहे, फिर्यादीतर्फे जो पुरावा झाला तो इतका विसंगत व इतका गैरविश्वसनीय आहे कीं त्यावर गंगारामनें धोंडीरामला शिव्या दिल्या किंवा त्याचा अपमान केला ही गोष्ट शाबित मानतां येत नाहीं.

वादाकरितां आपण असेंही समजूं कीं गंगारामनें धोंडीरामला शिव्या दिल्या. परंतु त्यानें ज्या शिव्यांचा उपयोग केला असेल त्यावरूनच शिव्या देण्यांत त्याचा उद्देश काय होता हें कळूं शकेल. आरोपीनें कोणच्या शिव्या दिल्या याबद्दल कांहींच पुरावा नाही. अशा तऱ्हेचा पुरावा नसेल व फिर्यादीचा अपमान करणेच्या उद्देशानें आरोपीनें शिव्यांचा उच्चार केला असें अनुमान काढतां येत नसेल तर केवळ आरोपीनें शिव्या दिल्या येवढेंच सिद्ध करण्यानें ५०४ कलम लागूं होणार नाहीं.

प्रस्तुत कज्जास सर्वथैव लागूं पडेल असा मद्रास हायकोर्टाचा एक निवाडा आहे. त्या निवाड्यांतील हकीकत व मद्रास हायकोर्टाचा निकाल असा आहे.—

व्यंकटरामचें तंबाखुचें एक दुकान होतें. एका इसमानें ( फिर्यादी ) त्याच्या दुकानांतील कांहीं तंबाखू विकत घेतली परंतु किंमत न देतांच फिर्यादीनें आरोपीच्या दुकानांतील कांहीं तंबाखु उचलून नेली. फिर्यादीच्या त्या कृत्यामुळें आरोपीस अर्थात संताप आला. त्या संतापाच्या भारांत त्यानें फिर्यादीला शिव्या दिल्या व धाकहि दाखविला. आरोपीच्या त्या कृत्यामुळें शांतताभंग होण्याची शक्यता होती व त्या कृत्यामुळें आरोपीनें आपला अपमान केला आहे, अशा सबबीवर फिर्यादीनें आरोपीवर पीनल कोडाच्या ५०४ कलमान्वयें खटला भरला. त्या खटल्यांत खालच्या कोर्टानें आरोपीला त्या कलमान्वयें दोषी ठरवून २५ रु. दंडाची शिक्षा दिली म्हणून त्यानें ( आरोपीनें ) रिव्हिजन केलें होतें. हायकोर्टानें रिव्हीजनमध्यें असें ठरविलें कीं, आरोपीनें फिर्यादीला शिव्या दिल्या व त्या शिवीगाळीमुळें बरिचशी मंडळी जमा झाली व वातावरण अशांत झाले. एवढ्यावरून आरोपीस क. ५०४ अन्वयें दोषी ठरवितां येणार नाहीं. कोणत्याही इसमास क. ५०४ अन्वये दोषी ठरविण्यासाठीं मुख्यतः दोन गोष्टींची आवश्यता असते. पहिली गोष्ट अशीं की एखाद्या इसमाचा अपमान करण्याच्या उद्देशानें आरोपीनें कृत्य ( शिवीगाळ वगैरे ) केले असले पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं, आपल्या कृत्यामुळें वातावरण प्रक्षुब्ध होऊन गुन्हा घडण्याची शक्यता आहे अशी जाणीव ते कृत्य करतांना आरोपीस असली पाहिजे. फिर्यादीला शिव्या देण्याचें आक्षिप्त कृत्य प्रस्तुतच्या

मुकदम्यांत आरोपीनें केले आहे असें खालच्या कोर्टानें ठरविले आहे, परंतु शिव्या कशाप्रकारच्या होत्या ह्या विषयीचा पुरावा मात्र कोठेंच आढळून येत नाहीं. शिव्या देण्यांत आरोपीचा काय उद्देश होता हे कळण्यास कांहींच मार्ग नाहीं. आरोपीनें ज्या शिव्या दिल्या असतील त्यावरूनच शिव्या देण्यांत त्याचा काय उद्देश होता हें आपणास कळूं शकेल. परंतु आरोपीनें फिर्यादीस कोणत्या शिव्या दिल्या ह्या विषयीचा तपशीलवार पुरावा प्रस्तुतच्या मुकदम्यांत आढळून येत नाहीं. अपमान करण्याच्या उद्देशानें शिवीगाळी करणें, हा क. ५०४ अन्वये गुन्हा आहे. परंतु प्रस्तुतच्या मुकदम्यांत आरोपीनें फिर्यादीला कोणत्या शिव्या दिल्या याविषयीचा खुलासा करण्यांत आला नसल्यामुळें फिर्यादीचा अपमान करण्याच्या उद्देशानें आरोपीनें शिवीगाळी केली, असें आपल्यास म्हणतां येत नाहीं. अशा परिस्थितींत आरोपीला क. ५०४ अन्वये दोषी ठरविणे कायद्यास धरून नाहीं. (१९४८ ए. आय्. आर. मद्रास पान ९.)

मद्रास हायकोर्टाचा वरील निर्णय पाहिला व या कज्ज्यांतील हकीकत लक्षांत घेतली म्हणजे असें दिसेल की, गंगाराम पूर्णपणें निर्दोषी असून ग्रामपंचायतीनें दिलेला निकाल चुकीचा आहे.

सबब

**असा हुकूम करण्यांत येत आहे कीं, आरोपीला निर्दोषी ठरवून सोडून देण्यांत यावे व त्यानें दंड भरला असल्यास तो त्यास परत करण्यांत यावा.**

(१९४९ न्यायबोध पानं १७ धोंडीराम वि. गंगाराम)

# ७

# मजेशीर मारामारी.

## बाबू वि. नाना.

(१) इंडियन पीनल कोड, कलम ३२३. (२) साधी मारामारी.
(३) पंचायतीला पेचप्रसंग. (४) मामलेदार वि. फडणीस फिर्याद.
(५) मनुष्य स्वभावाचा नमुना.

"नाना पवार हजर हाय का?"

न्यायपंचायतीच्या शिपायानें जोराचा पुकारा केला. नाना पवार कोर्टात आला आणि कज्जाचें काम सुरू झालें.

नाना पवार हा फडणिसांच्या — मामलेदार कोर्टातील अव्वल कारकून— यांच्या घरीं काम करणारा एक गडी होता.

त्याच्यावर बाबू जाधव यानें मारामारीबद्दल न्यायपंचायतीच्या कोर्टांत फिर्याद गुदरली होती.

मारामारीबद्दल कितीतरी फिर्यादी सदानकदा होत असतात. असल्या फिर्यादीबद्दल फारशी कुणी पत्रास बाळगत नाहीं.

चालतां चालतां किरकोळ ठेंच लागावी इतकीच किंमत असल्या फिर्यादीला बघे लोक देत असतात.

हा झाला नेहमींचा प्रकार. पण कित्येकदां असल्या वरवर दिसणाऱ्या किरकोळ फिर्यादीलाही खुनी कज्जापेक्षां जास्त महत्त्व येते. एरवी ठेंच कितीही किरकोळ असली तर मधुमेह झालेल्या माणसाच्या बाबतींत किरकोळ ठेंचच कित्येकदां भयानक नाहीं कां ठरत ?

अशांतलाच कांहींसा प्रकार बाबूवर नानानें केलेल्या फिर्यादीच्या बाबतींत झाला होता.

न्यायपंचायतीसमोर येणाऱ्या फिर्यादींपैकीं कांही कांही फिर्यादी खरोखरच फारच मजेशीर असतात. बापानें मुलाला मारले व मुलानें बापावर न्यायपंचायतीच्या कोर्टात फिर्याद केली असतांना पंचायतीच्या सभासदांना असा प्रश्न पडला कीं, कायद्याप्रमाणें बाप दोषी असल्यामुळें त्याला शिक्षा करणें भाग आहे, पण नैतिकरित्या मुलांची बाजू कमजोर असल्यामुळें बापाला शिक्षा केली तर पंचायतीच्या निर्णयाचे हंसें होण्याचा संभव आहे.

अशासारख्या कितीतरी मजेदार फिर्यादी न्यायपंचायतीसमोर येत असतात. बाबू जाधवानें केलेली फिर्याद असल्या फिर्यादींपेक्षांही मजेशीर होती.

मामलेदारसाहेब व फडणीससाहेब हे एकाच खेडेगांवचे रहिवाशी. कांहीं कारणानिमित्त दोघेही रजा घेऊन आपल्या खेडेगांवांत कांहीं दिवस येऊन राहिले होते.

बाबू मामलेदारांच्या घरीं गड्याचें काम करीत होता आणि नाना फडणीसांच्या घरीं गडी होता. त्यामुळें बाबूनें नानावर केलेल्या फिर्यादीला मामलेदार विरुद्ध फडणीस फिर्याद असें लोक विनोदानें म्हणूं लागले.

मामलेदारांचा बाळ बाबूच्या फार संवयीचा झाला होता. आणि आपल्या लाडक्या बाळाचें बाबू इतके कौतुक करतो आहे हें पाहून बाबूवर मामलेदार व मामलेदारीणबाई बेहद्द खूष होत्या.

नानाच्या बाबतींतही असाच प्रकार झाला होता.

फडणीसांचा मुलगा विजय हा त्याच्या फार संवयीचा झाला होता आणि तो विजयचें अत्यंत कौतुक करीत असल्यामुळें त्याच्यावर फडणीस व फडणीसीणबाईंची बहाल मर्जी होती.

मामलेदारीणबाई व फडणीसीणबाई ह्यांचे तितकेसें सख्य नव्हते. स्पष्टच सांगायचें म्हणजे त्यांचे मनोमनीं बरेंच वांकडे होते.

आपल्या यजमानांना एक अवाक्षरही न कळवतां बाबूला मामलेदारीण बाईनीं त्याच्या फिर्यादीच्या कामीं पैशाची बरीच मदत दिली व म्हटलें—

"या कामीं वाटेल तितके पैसे खर्च कर पण त्या फडणीसीणबाईच्या नोकराला खूप शिक्षा झाली पाहिजे. त्या शिवाय नाहीं त्या बाईची खोड मोडणार !"

फडणीसीणबाईनीं आपल्या पतिराजांना काडीचा थांगपत्ता लागू न देतां नाना व त्याचा भाऊ आबा ह्यांना ह्या फिर्यादीबद्दल बरेच पैसे दिले व म्हटलें—

"या कामीं वाटेल तितके पैसे खर्च झाले तरी हरकत नाहीं पण खोटी फिर्याद केल्याबद्दल व बेअब्रू केल्याबद्दल मामलेदारीणबाईच्या नोकराकडून जबर रक्कम वसूल झाली पाहिजे, त्या शिवाय नाहीं त्या बाईची खोड मोडणार !"

हा कज्जा अटीतटीनें सुरू झाला.

मामलेदार व फडणीस या दोघांना मात्र वाटत होते कीं, हे गरीब बिचारे शिपाई कशाला उगीच इतका पैसा खर्च करून फुकट बुडत आहेत ? पण अंदरकी बात त्यांना काय माहीत ? या फिर्यादीचें कामीं आपलेच पैसे खर्च होत आहेत हे त्यांना कळलें असते तर...

मामलेदारीणबाई व फडणीसीणबाई ह्याच ह्या कज्जाच्या कामीं सर्व पैसा खर्च करीत आहेत व असल्या चमत्कारिक तऱ्हेनें त्या एकमेकींची खोड मोडूं पहात आहेत ही गोष्ट एका कारकूनाला माहीत होती; पण तो एक चकार शब्दही कोणाशीं बोलला नाहीं. तो आपल्याशींच म्हणाला...

"मामलेदार व फडणीस स्वभावानें किती सज्जन आहेत व त्यांचे परस्पर संबंधही किती प्रेमाचे नि आपुलकीचे आहेत. पण...त्यांच्याच बायकामध्यें असें विळ्याभोपळ्यासारखें नातें असावे ना ?"

पुरुष बेताबेतानें व बराच उद्योग करून मोठे होत असतात, पण बायका एकदम अनायासे मोठ्या होतात. पुरुष मोठे झाल्यावर त्यांना त्या प्रमाणांत

जबाबदारीचें व बडे काम असतें, पण बायका मोठ्या झाल्यावर एकमेकींच्या उखाळ्या पाखाळ्या काढून परस्पराबरोबर भांडणें हें त्यांचें बडे काम असतें.

फिर्यादीनें आपल्यातर्फे बराच पुरावा केला पण त्या पुराव्यामध्यें बराच लंगडेपणा होता. त्या पुराव्यावरून आरोपीनें फिर्यादीला मारले किंवा कसे ह्याबद्दल बराच संशय निर्माण झाला होता. फिर्यादीच्या बाजूचा पुरावा पडलेला पाहून आरोपीच्या बाजूच्या लोकांना आनंदाच्या उकळ्या येत होत्या.

आज आरोपीचा जबाब होता. त्यानें काय सांगणेंचे ह्याबद्दल त्यांस तीन चारदां संधि देण्यांत आली होती. मी फिर्यादीला मारले नाहीं वा शिवीगाळही केली नाहीं; त्यानें दुष्टबुद्धीनें व आकसानें माझ्यावर ही खोटी फिर्याद केली आहे. हें त्या जबाबाचें धृपद होतें.

आरोपीला पिंजऱ्यांत उभे करण्यांत आलें व त्याचा जबाब सुरूं झाला.

आरोपीनें सांगितलें...

साहेब ! आपल्या गादीसमोर मी खोटें बोलत नाहीं...मी बाबूच्या एक थोबाडींत मारली व त्याला शिवीगाळ केली ही गोष्ट खरी आहे.

आरोपीच्या बाजूचे लोक आ करून नानाकडे पाहूं लागले. आतांपर्यंत मिळालेल्या यशावर सपशेल विरजण पडलें.

नानाचा भाऊ आबा सारखी चुळबूळ करूं लागला. पण नाना साक्षीच्या पिंजऱ्यांत असल्यामुळें यावेळीं त्याला सूचना देणें शक्य नव्हते. कोर्टाचे नियम आबाला माहीत होते, तरी नानाचा जबाब ऐकल्यावर तो एकदम आणि मोठ्यानें बोललाच.........

अरे ! खुळसटा ! काय, बोलतोस काय ? कोर्टाच्या शिपायानें आबाला गप्प बसवलें व जास्त बोलशील तर बाहेर घालवून देईन अशी धमकी दिली.

नानाचा जबाब पुढें चालूं झाला. त्यानें आपल्या जबानींत सांगितलें......

माझ्याजवळ विजय..फडणीसाचा मुलगा.. होता व बाबूजवळ बाळासाहेब... मामलेदारांचे चिरंजीव...होते बोलता बोलतां बाबू म्हणाला......

हे बघ माझे बाळासाहेब उद्यां मामलेदार होणार ! तुझा विजय मात्र त्यांच्या हाताखालचा कारकूनच होणार ! बाबूचें हे शब्द ऐकून मला संताप आला. मी म्हटलें,

राहूं दे! माझा विजय नांवाचा विजय आहे. उद्यां तोच मामलेदार होऊन या तालुक्याचा राजा म्हणून मिरविणार आणि तुझे बाळासाहेब त्यांच्या हाताखालचे किरकोळ कारकून होऊन मानेवर खडा ठेवल्याप्रमाणें खर्डे घाशीत बसणार?

माझे हे शद्ब ऐकून बाबू चिडला. तो विजयला वाटेल ते बोलूं लागला. मलाही चीड आली आणि मी सुद्धां बाळासाहेबांना वाटेल ते बोललो. शेवटीं...

अरे! तूं कवडी किंमतीचा शिपाई! आणि मामलेदारांच्या मुलाला असें बोलतोस काय? असें म्हणून बाबूनें माझ्या पाठींत एक बुक्की मारली.

अरे! तूं दीड दमडीचा शिपाई! फडणीसापेक्षां तूं आपल्याला मोठा समजतोस काय? असें म्हणून मीहि त्याच्या एक तोंडांत दिली......

नानाचा जबाब संपला व कज्ज्याची तारीख पुढें नेमण्यांत आली.

नानाचा जबाब ऐकून पंचायतीचे सभासद एकमेकाशीं चर्चा करूं लागले. पंचायत कायद्याच्या ६८ कलमाप्रमाणें बाबूनें केलेली फिर्याद योग्य अशीच होती. नानाचा जबाब पाहिल्यावर बाबूची फिर्याद खरी होती, यापुरता वाद नव्हता. इं. पि. कोडच्या ३२३ कलमाप्रमाणें नानाला कांहींतरी दंड करणें न्यायपंचायतीच्या सभासदाना भाग होते पण......

नानाला दंड केला तर तें कितपत रास्त होईल? बरे भरपूर दंड केला नाहीतर मामलेदारांना काय वाटेल? दंड केला तर फडणीस काय म्हणतील? वगैरे कितीतरी प्रश्न पंचायतीच्या सभासदांपुढें उभें राहिलें. आणखी कांहीं दिवस जाऊं देत. पुढच्या तारखेला काय करावयाचे तें पाहूं असें म्हणत न्याय-पंचायतीचे लोक आपआपल्या घरीं गेले.

नानाचा जबाब ऐकल्यावर मामलेदारांच्या मनांत कालवाकालव सुरू झाली. त्यांनीं त्याबद्दल चौकशी केली. त्यांना पुरते समजून आलें कीं, नानानें जो जबाब दिला तो शेंकडा १०० टक्के खरा आहे.

त्यांच्या मनांत विचार आला.

लोकांच्या घरीं काम करणारे हे शिपाई लोकांच्या मुलाशीं इतकें तादात्म पावतात कां ? आज मी मामलेदार आहे. पण माझा मुलगा पुढें मामलेदार होईल कशावरून ? कदाचित तो किरकोळ कारकूनही होईल. जगांत असेंच नेहमीं नाहीं कां घडत ? आज फडणीस अव्वल कारकून आहेत, पण त्यांचा मुलगा कदाचित मामलेदारही होईल ! नाना म्हणाला त्यांत खरोखर काय चूक होती ?...पण.... माझा मुलगा व फडणीसांचा मुलगा यांना आपलीच मुलें समजून त्यांच्या भविष्य-काळाबद्दल या दोन शिपायांनीं अशाप्रकारें भांडावें हा अजब प्रकार नाहीं कां ? या आत्मीयतेबद्दल शिपायांचे कौतुक करावें, कां असल्या भांडणाबद्दल त्यांना रागें भरावें ?......

दुसरें दिवशी बाबू जाधव व नाना पवार यांनीं आपसातीचा अर्ज कोर्टांत दिला व कज्ज्याचा निकाल लागला.

सर्वत्रांना आनंद झाला.

मामलेदारीणबाई व फडणीसीणबाई मात्र मनांतल्या मनांत चरफडत होत्या.

# ८

# सार्वजनिक तळ्याचें पाणी खराब करणें हा गुन्हा होतो काय ?

## सदाशिव वि. सदानंद.

ई. पी. कोड, कलम २७७...सार्वजनिक जलाशयाचें पाणी खराब करणें, मालक व त्यांचे वंशज ह्यांचा अधिकार, अस्पृश्यानें पाणी नेण्यानें पाण्याची खराबी होते काय ?

एक होता साधू. त्याचें नांव सदानंद.

तमदड्डी गांवांत एक मठ होता. त्या मठाचा मुखत्यार म्हणून सदानंद व्यवस्था पहात असे. शिष्यपरंपरेनें आतांपर्यंत त्या मठाचे मुखत्यार होऊन गेले. होते. पूर्वीच्या काळीं त्या मठानें लोकांच्याकरितां फारच उपयुक्त कामें केलीं होती. गांवांतील लोकांची पाणी पिण्याची सोय व्हावी म्हणून या मठाकडून पूर्वी एक छोटेसें तळें बांधण्यांत आलें होतें. आज ह्याच तळयाच्या पाण्यामुळें लोकांची पिण्याच्या पाण्याची गरज भागत होती.

ह्या तळ्यांत कुणालाही आंघोळ करण्याला अगर कपडे धुवायला परवानगी दिली जात नसे. या तळयाच्या बाबतींत सदानंदाची व गांवांतील कांहीं लोकांची

कुरबूर झाली व त्यानंतर सदानंद म्हणूं लागला कीं, तें तळें आपल्याच मालकीचें असून आपण त्याचा वाटेल तसा उपयोग करणार. आपला हक्क प्रस्थापित करण्याकरितां सदानंद रोज त्या तळ्यांत आंघोळ करूं लागला व अन्यतऱ्हेनेंही तळ्याचें पाणी बिघडवूं लागला.

ह्या तळ्याशिवाय दुसरें पिण्याचें पाणी गांवांतील लोकांना मिळत नसल्यामुळें लोकांची मोठी गैरसोय होऊं लागली. गांवच्या लोकांच्या तर्फे सदाशिव सदानंदकडे गेला व म्हणाला कीं, तळ्यामध्यें आंघोळ करणें बरें नव्हें. सदाशिवाचें म्हणण्याला सदानंदानें कांहींच किंमत दिली नाहीं.

शेवटीं न्यायपंचायतीच्या कोर्टांत सदाशिवानें सदानंदावर फिर्याद केली. ह्या फिर्यादीमध्यें बराच पुरावा झाला व शेवटीं न्यायपंचायतीनें जो निकाल दिला तो असा......

"ज्या तळ्याबद्दल वाद आहे तें तळें लोकांच्या उपयोगाकरितां पूर्वीच्या काळीं बांधलें गेलें याबद्दल फारसा वाद नाहीं. सदानंदतर्फे असें सांगण्यांत येत आहे कीं, हें तळें आपल्या मठानें पूर्वीच्या काळीं लोकांच्या करितां बांधलें होतें व आजही या तळ्याचा उपयोग लोकांच्याकरितां व्हावा हें योग्य आहे. परंतु या तळ्याचें पाणी उच्चवर्णीय लोकांनीं न्यावे अशी मठाची इच्छा आहे. ही इच्छा धाब्यावर बसवून कांही अस्पृश्य लोकांनीं अलीकडे या तळ्याचें पाणी नेण्यास सुरवात केली आहे. अशा तऱ्हेनें हें तळें विटाळलें गेलें याबद्दल मठातर्फे त्या अस्पृश्य लोकांवर न्यायपंचायतीचे कोर्टांत फिर्याद गुदरण्यांत आली. पण त्या फिर्यादीमध्यें सर्व अस्पृश्य लोकांना निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत आल्यामुळें सदानंद व त्याचे सहाय्यक अतिशय संतापले. सदानंदातर्फे आणखी असें सांगण्यांत येत आहे कीं, या बाबतींत कांहीं तरी मार्ग काढावा म्हणून मठातर्फे असें ठरविले कीं, मठाचा मुखत्यार म्हणून सदानंदानें तळ्यांत आंघोळ करावी व लोकांनीं जरूर वाटल्यास साधूचें तीर्थ म्हणून तळ्याचें पाणी न्यावें.

सदानंदाचे विरुद्ध जो पुरावा आला आहे त्यावरून असे दिसते कीं, तळ्यांत आंघोळ करून, थुंकून व इतर तऱ्हेनें सदानंद रोज तळ्याचें पाणी बिघडवितो आणि त्यामुळें तसलें पाणी नेण्यास लोकांना शिसारी वाटते. सदानंदाच्या बाजूचे जे साक्षीदार झाले आहेत त्यांचें असें म्हणणे आहे कीं, सदानंद हा एक मोठा साधू आहे. मठाकडून लोकांच्यासाठीं बांधण्यांत आलेल्या तळ्यांत आंघोळ करणें अथवा. इतर तऱ्हेनें पाणी खराब करणें हा मठाचा मुखत्यार म्हणून सदानंदाचा जन्मसिद्ध हक्क आहे.

इंडियन पीनल कोड, कलम २७७ मध्यें असें म्हटलें आहे कीं, जो कोणी आपखुशीनें सार्वजनिक तळ्याचें अथवा तलावाचें पाणी खराब करील व त्यायोगे पाण्याची उपयुक्तता कमी करील त्यांस तीन महिनेपर्यंत कैदेची शिक्षा अगर पांचशें रूपयेपर्यंत दंड होईल. ज्या तळ्याबद्दल वाद आहे तें तळें सार्वजनिक आहे याबद्दल कांहींच शंका नाहीं. सदानंदाच्या कृत्यामुळें तळ्याचें पाणी बिघडतें आहे व लोकांची मोठी गैरसोय होत आहे. जें शेवटीं परिशिष्ट दिले आहे त्यावरून असें दिसेल कीं, इंडियन पीनल कोड, क. २७७ खालीं येणाऱ्या गुन्ह्याची न्यायपंचायतीला चौकशी करतां येते.

या कज्ज्यांत जो पुरावा झाला त्यावरून असें दिसतें कीं, सदानंदान इंडियन पीनल कोड, कलम २७७ प्रमाणें गुन्हा केला आहे. सदानंद आपल्याला साधू म्हणवितो परंतु त्याचे प्रस्तुतचें कृत्य त्याच्या साधुपणाला शोभत नाहीं. आपण केलेल्या कृत्याबद्दल पश्चाताप वाटण्याच्या ऐवजीं सदानंदाला त्यांत फुशारकी वाटते. सर्व पुरावा विचारांत घेऊन आम्हीं असे फर्मावितो कीं, सदानंदाला इडियन पीनल कोड, क. २७७ प्रमाणें दोषी ठरविण्यांत येत असून त्याला १० रुपये दंडाची शिक्षा देण्यांत येत आहे.

पंचायत कायद्याच्या ८३ कलमाप्रमाणें जेव्हां हें काम वरच्या कोर्टांत गेले तेव्हां तेथें बराच उहापोह झाला. वरच्या कोर्टानें जो निकाल दिला तो असा...

खालच्या कोर्टात झालेला पुरावा विचारांत घेतला म्हणजे असे दिसते कीं, न्यायपंचायतीनें दिलेला निकाल अगदीं योग्य असाच आहे. सदानंदातर्फे कायद्याचे

प्रश्न व इतर कांहीं प्रश्न उपस्थित करण्यांत आले आहेत पण त्यांत फारसा अर्थ दिसत नाहीं.

महाराणी वि. भागी...२ मुंबई लॉ रिपोर्टर, पान १०७८...ह्या निवाड्यांत तिच्यावर इंडियन पीनल कोड, क. २७७ प्रमाणें गुन्हा शाबीत होतो अगर कसें हा प्रश्न उपस्थित झाला होता. हायकोर्टानें असें म्हटलें कीं, खालच्या जातीच्या स्त्रीनें सार्वजनिक ठिकाणचें पाणी नेण्यानें तें पाणी बिघडलें अथवा त्याची उपयुक्तता कमी झाली असें म्हणतां येत नाहीं आपण यामुळें त्या स्त्रीला दोषी धरतां येत नाहीं.

रामकरणलाल वि. सरकार...१८ क्रिमीनल लॉ जर्नल, पान ६५०... या कज्जांत आरोपी सार्वजनिक विहीरीमध्यें थुंकला होता. त्या विहीरीचें पाणी पिण्याकरितां उपयोगांत आणलें जात होतें. हायकोर्टानें असें ठरविलें कीं, आरोपीचें कृत्य इंडियन पीनल कोड क. २७७ खालीं येत असून त्या कलमाखालीं तो दोषी आहे.

वरील दोन कज्जे पाहिले म्हणजे असें दिसेल कीं, सदानंदातर्फे करण्यांत आलेल्या तक्रारींत कांहीं अर्थ नसून त्याचें कृत्य २७७ कलमाप्रमाणें गुन्ह्याच्या सदरांत येते. सदानंदातर्फे इतर ज्या तक्रारी करण्यांत आल्या त्याबद्दल असें म्हणतां येईल कीं, आपल्या पूर्वजांनीं दानधर्माचे जे निरनिराळे प्रकार सांगितलेले आहेत त्यामध्यें सार्वजनिक उपयोगाकरितां जलाशयें बांधणें हा एक प्रकार आहे. लोकांच्या उपयोगाकरितां जलाशयें हा एक उच्च दानाचा प्रकार आहे असें ह्या बाबतींत म्हटलें आहे. (हेमाद्रि दानखंड ७-५०२).

आपल्या पूर्वजांचे ग्रंथ पाहिले म्हणजे असें दिसतें कीं, एखाद्यानें लोकांच्या उपयोगाकरितां जलाशय बांधल्यावर त्यावरील त्याची मालकी नष्ट होते; मात्र कायदेशीर मालकी नष्ट झाली तरी त्या जलाशयाची दुरुस्ती करण्याची धार्मिक जबाबदारी जलाशयें बांधणाऱ्यावर व त्याच्या वंशजावर असते. एकदा जलाशयाचें दान केल्यावर त्याचा उपयोग मालकाला स्वतःकरितां केव्हांच करतां येणार नाहीं असें कांहीं मुनींचें मत आहे, पण रघुनंदनाच्या मताप्रमाणें

त्या जलाशयाचा उपयोग मालकाला व त्याच्या वंशजांना इतर लोकांप्रमाणें मालक म्हणून नव्हे...करण्यास हरकत नाहीं. हीं दोन्हीं मतें विचारार्ह असलीं तरी रघुनंदनाचें मत जास्त सयुक्तिक दिसतें.

सदानंदाच्या पूर्वीच्या व्यवस्थापकांनीं सार्वजनिक उपयोगाकरितां तळें बांधलें असल्यामुळें व त्या तळ्याचें दान त्यांनीं लोकांना केलें असल्यामुळें आतां सदानंदाला असें म्हणतां येणार नाहीं कीं, आपण त्या तळ्याचे मालक आहों. इतर लोकांप्रमाणें त्या तळ्याचा उपयोग सदानंदानें करण्यास हरकत नाहीं.

कायद्याची ही परिस्थिती लक्षांत न घेतां सदानंद जी वागणूक करीत आहे ती त्याला शोभणारी नाहीं. खालच्या कोर्टानें जो ठराव दिला आहे तो सर्वथैव युक्त असाच आहे. सबब खालच्या कोर्टानें दिलेली दंडाची शिक्षा कायम ठेवण्यांत यावी, असा आम्ही हुकूम देतों.

---

९

# निधर्मी राज्यांतील जातिवाद !

**प्रश्न**—मद्रास सरकारनें शिक्षणाच्या बाबतींत जातिवादावर आधारलेला एक हुकूम केला होता. त्या हुकुमाविरुद्ध एका स्त्रीनें कोर्टांत दाद मागितली तेव्हां तो हुकूम मद्रास हायकोर्टानें व सुप्रीम कोर्टानें नामंजूर केला असें मी पेपरमध्यें वाचलें. तरी तो निकाल काय झाला त्याची हकीकत आपण कृपा करून सांगाल काय ? मी असें ऐकलें कीं, या निकालानंतर मध्यवर्ती सरकारनें घटनेमध्यें कांहीं फेरफार केला आहे. तो फेरफार काय केला तें कृपा करून सांगावें व या फेरफारामुळें काय फरक झाला तेंहि कृपया कळवावें. असें म्हणतात कीं, जातिवादाच्याबाबतीत पांच हजार वर्षांपूर्वी महाभारतांत जें सांगितलें आहे, त्याचा अवलंब केला असतां आपल्या देशांत चालू असलेला जातिवाद नाहींसा होईल व आपलें राज्य खऱ्या-खुऱ्या अर्थानें निधर्मी राज्य होईल. जातिवादाचा मजकूर महाभारतामध्यें कोणत्या पर्वात आहे ?

**उत्तर**:—जात जन्मावर अवलंबून नसून गुणावर अवलंबून असते व ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजेच जातिवादाचे दुष्परिणाम टाळतां येतात असें

महाभारतकारांनी सांगितलें आहे. या बाबतींत महाभारतांतील अजगर पर्वांमध्यें युधिष्ठिर व सर्प यांच्या संवाद दिला आहे तो आपण जरूर वाचावा.

आपल्याला ज्या कज्जाची हकीकत पाहिजे, त्या कज्जाचें नांव खालीलप्रमाणें आहे-

## स्टेट ऑफ मद्रास वि. श्रीमती चंपकम् व इतर
## ( १९५१ ऑ. इं. रि. सुप्रीम कोर्ट, पान २२६ )

या कज्जाची हकीकत व निकाल थोडक्यांत असा:--

श्रीमती चंपकम् हिनें मद्रास प्रांतांतील सरकारनें चालविलेल्या मेडिकल कॉलेजांत प्रवेश मिळल्याबद्दल विचारणा केली असतां तिला सांगण्यांत आले कीं, ती ब्राह्मण असल्यामुळें तिला प्रवेश मिळणार नाहीं. त्याचप्रमाणें श्रीनिवास याहि एका ब्राह्मण जातीच्या विद्यार्थ्यांनें मद्रास सरकारनें चालविलेल्या अिंजिनिअरिंग कॉलेजांत प्रवेश मिळण्याकरितां अर्ज केला होता. त्यालाहि कॉलेजांत प्रवेश नाकारण्यांत-आला.

त्या दोघांनीं मद्रास हायकोर्टात, वरील शिक्षण संस्थांनीं प्रवेश नाकारल्या बद्दल, घटना कायद्याच्या कलम २२६ प्रमाणें ( कलम १५ ( १ ) व कलम २९ ( २ ) च्या मिळालेल्या ) त्यांच्या मूलभूत हक्कांच्या बचावाकरितां अर्ज केले.

दोघांचेंहि म्हणणें असें होतें कीं, त्यांच्या परीक्षेच्या गुणांवरून व लायकीवरून त्यांना कॉलेजमध्यें प्रवेश मिळाला पाहिजे होता. परंतु मद्रास सरकारच्या हुकुमानें जातिवार प्रवेशाचें प्रमाण ठरलें असल्यामुळें त्या प्रमाणावर विद्यार्थ्यांची निवड केली गेली व ते इतर कोणत्याहि जातीच्या विद्यार्थ्यांपेक्षां वरचढ असूनसुद्धां त्यास कॉलेजांत प्रवेश मिळाला नाहीं व विशेषत: ते ब्राह्मण नसून इतर कोणत्याहि जातींचे असते तर त्यांना खात्रीनें प्रवेश मिळाला असता. तरी जातीवर आधारलेल्या कॉलेजांत प्रवेश देण्याचें सरकारी धोरण घटना कायदा कलम २९ (२) नें नागरिकांस दिलेल्या मूलभूत हक्कांस बाध आणणारें आहे. सबब, जातवारीच्या प्रमाणावर आधारलेला सरकारी हुकूम बेकायदा ठरविण्यांत यावा व त्यानुसार केलेली विद्यार्थ्यांची निवड थांबविण्याचा हुकूम द्यावा.

मद्रास हायकोर्टानें दोन्ही अर्जांच्या बाबतींत असा निर्णय दिला कीं, ज्या सरकारी हुकुमान्वयें जातवारीचें प्रमाण ठरवून कॉलेजांत प्रवेश दिला जातो, तें तत्व घटना कायद्याच्या २९ (२) कलमाशी विसंगत आहे व या हुकुमामुळें दोन्ही अर्जदार लायक असून प्रवेश मिळणाऱ्या पुष्कळ उमेदवारांच्या वरचढ असूनसुद्धां निव्वळ ब्राह्मण असल्यामुळें त्यांस प्रवेश मिळूं शकला नाहीं, हें निर्विवाद दिसतें. सबब अर्जदारांचे अर्ज हायकोर्टानें मंजूर केले.

वरील दोन्ही निकालावर मद्रास सरकारनें हीं अपीलें केली आहेत. यात सरकारी वकिलानें ही गोष्ट कबूल केली कीं, जातिवार तत्वास सोडून निव्वळ लायकी व परीक्षेंतील गुणावरूनच जर कॉलेजांत प्रवेश दिला गेला तर दोन्ही उमेदवारांस खात्रीलायक प्रवेश मिळाला पाहिजे. परंतु सरकारी वकिलांचें म्हणणें असें कीं, यांत कलम २९ हें घटनेच्या दुसऱ्या कलमास धरून वाचावें व घटनेचें कलम ४६ प्रमाणें मागासलेल्या जमातीसबंधीनें सरकारास संरक्षण द्यावें लागतें व त्यांतील तत्वें शासनाच्या दृष्टीनें मूलभूत असून कलम ३७ प्रमाणें त्या तत्वांची कायदे करण्याच्या दृष्टीनें जरूर पडतें. सबब, जातिवार प्रवेशाचा सरकारी हुकूम घटनेच्या २९ (२) कलमाला विरोधी नाहीं व अर्जदारास त्यामुळें प्रवेश मिळाला नाहीं हें योग्य असून त्यामुळें त्यांच्या मूलभूत हक्कास कोणतीच बाधा होत नाहीं.

हीं विधानें आम्हांस मुळींच ग्राह्य नाहीत. घटनेचें कलम २९ (२) मध्यें स्पष्ट म्हटलें आहे कीं, कोणत्याही नागरिकास धर्म, जात, पंथ व भाषा वगैरे बाबीकरितां म्हणून सरकारतर्फे चालविलेल्या अगर सरकारच्या पैशानें चालविलेल्या शिक्षणसंस्थेंत प्रवेश नाकारला जाणार नाहीं. लायकी नसलेल्या विद्यार्थ्यांच्या मूलभूत हक्कांस बाध येतो असें म्हणतां येणार नाहीं, लायकी असलेल्या उमेदवारास प्रवेश न देणें म्हणजे घटनेनें त्यास दिलेला मूलभूत हक्क नाकारणें होय.

घटना कायद्याच्या तिसऱ्या भागांचीं कलमें स्वतंत्र असून त्यांचीं कोर्टास अंमलबजावणी करतां येते. मूलभूत हक्कांचा हा भाग निधर्मी आहे व त्यास कोणत्याहि हुकुमानें बाध करता येणार नाही. घटनेच्या ४ थ्या भागांतील तत्वें ३ ऱ्या भागाशीं विसंगत राहूं शकत नाहींत.

याशिवाय सरकारांतील नोकऱ्यासंबंधीं कलम १६ मध्यें जे मूलभूत हक्क नागरिकांस दिले आहेत, त्या कलमालाच मागासलेल्या जमातीकरितां जसा भाग (४) जोडून जागा राखीव ठेवण्याची तरतूद केली आहे, तशी या (२९) कलमालाहि भाग जोडून मागासलेल्या जातीची सोय विधान सभेस करतां आली असती. परंतु ज्या अर्थीं तसा भाग तेथें जोडला नाहीं, त्या अर्थी त्याचा अर्थ असा होतो कीं, शिक्षणाच्या प्रवेशाच्या बाबतींत जातिवार प्रमाणाचें धोरण घटना करणाऱ्यास संमत नव्हतें, एवढेंच नव्हे तर मागासलेल्या जातींकरितां सुद्धां तशी तरतूद करण्याची आवश्यकता विधान सभेस दिसली नाहीं.

श्रीनिवासनें इतर जातीच्या उमेदवारापेक्षां पुष्कळ जास्त गुण मिळवून-सुद्धां तो प्रवेश मिळवूं शकला नाहीं व ब्राह्मणेतर अगर दुसऱ्या जमातीचे उमेदवार कमी गुण मिळवून प्रवेश मिळवूं शकले, ही गोष्ट तो ब्राह्मण असल्यामुळेंच घडली व तो ब्राह्मणेतर अगर दुसऱ्या कोणत्याहि जातीचा असता तर ती घडली नसती. सबब मद्रास सरकारचा हुकूम जातवारीवर प्रवेशाचें प्रमाण ठेवणार असून तो घटना कायद्यास विसंगत आहे. उमेदवारांचा शिक्षणप्रवेश त्यांच्या लायकीवरच दिला जावा व त्याप्रमाणें हे अर्ज आम्ही मंजूर करतों.

**टीप**:—या सुप्रीम कोर्टाच्या निकालानंतर ता. १८–६–५१ रोजीं घटना कायद्याच्या कलम १५ मध्यें घटना (पाहिली दुरुस्ती) कायदा १९५१ प्रमाणें दुरुस्ती केली आहे. या कलमाला आतां भाग (४) जोडले आहे ते असे–"भाग (४) च्या कलम १५ मध्यें किंवा भाग (२) कलम २९ मुळें प्रांतिक सरकारांस अगर शैक्षणिक दृष्टीनें मागासलेल्या नागरिकांच्या जमातींकरितां अगर हरिजन जातींकरितां अगर अस्पृश्य गटांकरितां प्रामुख्यानें सोयी करण्यास बाध येणार नाहीं."

या दुरुस्तीमुळें जो अधिकार प्रांतिक सरकारांस नव्हता, तो दिला गेला आहे. परंतु फक्त मागासलेल्या जातींकरितां अशा तऱ्हेच्या अधिकारांची अंमलब-जावणी करतां येईल.

**सारांशः**—कोणत्याही सरकारी अगर सरकारच्या पैशाच्या सहाय्यानें चालविलेल्या शिक्षणसंस्थेंत वरील घटना दुरुस्तीनें दर्शविलेल्या मर्यादेशिवाय जात, धर्म अगर पंथ वगैरे कारणानें प्रवेश नाकारतां येणार नाहीं. घटना दुरुस्तीपूर्वी हरिजन अगर मागासलेल्या जातींकरितां सरकारांस शिक्षणसंस्थेंत राखीव जागा ठेवतां येत नव्हत्या व सध्यां प्रांतिक सरकारास जरी वरील अधिकार दिलेले असले तरी मद्रास सरकारनें ज्या हुकुमानें प्रवेशाबद्दल सर्वच जातिकरितां राखीव प्रमाण ठरविलें होतें, तो हुकूम दुरुस्तीनें दिलेल्या अधिकारांच्या केव्हांहि अतिक्रमण करणारा समजला गेला असता. सबब, सदरहू हुकूम कोणत्याहि परिस्थितींत घटना कायदा कलम २९ (२) ने नागरिकांस दिलेल्या हक्कांस बाध आणणारा असून अशा हुकूमाविरुद्ध नागरिकांस कोर्टांत दाद मागतां येईल.

—×—

# १०

# तिसरी बायको

बायको माहेरी गेली असतां अथवा बाळंतीण असताना कांहीं कांहीं पुरुष दुसरें लग्न उरकून घेतात. बायको म्हणजे एक भोग्य वस्तू आहे. याच्या पलीकडे हे फारसा विचार करीत नाहींत. त्यांना वाटतें कीं, आपण आपल्या सुखाकरिता कितीहि बायका केल्या. तरी बायकांनीं मात्र नवऱ्याजवळ मुकाट्यानें रहावें. या लोकांनीं आतां लक्षांत ठेवावें कीं, पुरषांच्या मदतीला नेहमी धांवून येणारा कायद्याचा प्रवाह आतां बदलला असून समान हक्काचा काळ आतां सुरू झाला आहे. नमूना म्हणून खालील कज्जा पाहाण्यासारखा आहे.

सत्यनारायणची पहिली बायको मरण पावल्यानंतर त्यानें दुसरें लग्न केलें. लग्नानंतर कांहीं दिवसांनीं सत्यनारायणची दुसरी बायको माहेरी गेली. ती माहेरहून बरेच दिवसपर्यंत परत आली नाहीं. दरम्यानच्या काळांत सत्यनारायणनें मंचरम्याशी लग्न केलें. आपली दुसरी बायको जिवंत आहे, परंतु तिच्याशीं आपला कांही एक संबंध राहिला नाहीं अशी खोटीच बतावणी सत्यनारायणनें मंचरम्माशीं केली. मंचरम्मानें त्या बतावणीवर विश्वास ठेवून सत्यनारायणशीं लग्न केलें. लग्नानंतर तीं दोघें संसार करूं लागली. मंचरम्माला दिवस गेले. सत्यनारायणनें बाळंतपणासाठीं तिला माहेरी पाठविलें. त्यानंतर सत्यनारायणनें

आपल्या दुसऱ्या बायकोला ( मंचरम्मा ही तिसरी बायको होती. ) माहेराहून परत बोलाविलें. ती येण्यास तयार होईना. सत्यनारायण सर्व इस्टेट जर आपल्या नांवानें करून देईल तर आपण येण्यास तयार आहोंत असें तिनें कळविलें. सत्यनारायणनें तिचें म्हणनें मान्य केलें. व सर्व इस्टेट तिच्या नांवानें करून दिल्यानंतर ती सत्यनारायणजवळ राहण्यास आली. पुन्हां त्या दोघांचा संसार सुरू झाला. मंचम्माला ही गोष्ट कळली, सत्यनारायणजवळ येऊन राहाण्यास ती तयार होईना. सत्यनारायणनें पराकाष्टेचा प्रयत्न करून पाहिला; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं सत्यनारायणनें मंचरम्मावर दावा लावला. व वैवाहिक हक्क पूर्ववत् उपभोगण्यासंबंधीचा हुकूमनामा मिळावा अशी मागणी मागितली. मंचरम्मा व तिचा बाप हे दोघें कोर्टांत हजर झाले. सत्यनारायणपाशीं जाऊन राहाण्याची तयारी मंचरम्मानें दाखविली. मंचरम्माला बचाव द्यावयाचा नाहीं व तिला दावा कबूल आहे असें गृहित धरून अव्वल कोर्टानें तिच्यावर हुकूमनामा दिला. त्या हुकूमनाम्यावर मंचरम्मानें अपील केलें, मंचरम्मानें सत्यनारायणपाशीं जाऊन राहाण्याची तयारी दाखविली. त्यामुळें पुरावा वगैरे घेण्याचा अव्वल कोर्टाला गरज नव्हती व अव्वल कोर्टानें दिलेला हुकूमनामा अगदीं रास्त आहे असें ठरवून अपील कोर्टानें तें अपील फेटाळून लावले. त्यावर मंचरम्मानें हें अपील केलें होतें. अपीलांत मंचरम्मानें एक प्रतिज्ञालेख ( आफिडेव्हिट ) दाखल केला. त्या प्रतिज्ञालेखांत पुढीलप्रमाणें मजकूर होता—

" दुसऱ्या बायकोशीं आपला कांहीं संबंध नाही असें सत्यनारायणनें निक्षून सांगितल्यामुळें आपण सत्यनारायणशीं लग्न केलें. सत्यनारायण दुसऱ्या बायकोशीं मुळींच संबंध ठेवणार नाहीं त्या अटीवर आपण त्याच्याशीं लग्न केलें. परंतु सत्यनारायणनें ती अट मोडून दुसऱ्या बायकोला आपल्या घरीं राहाण्यास आणिलें एवढेंच नव्हें, तर त्यानें आपली सर्व इस्टेट तिच्या नांवानें करून दिली आहे, व तिला त्याच्यापासून दोन मुलेंहि झालीं आहेत. आपण कांहीं अटीवर सत्यनारायणपाशीं जाऊन राहण्यास तयार होतों; परंतु अव्वल कोर्टानें पुरावा वगैरे न घेतां आपण बिनशर्त जाऊन राहण्यास तयार आहोंत असें चुकीनें गृहीत धरून हुकूमनामा दिला आहे. "

मंचरम्मानें वरील आशयांचा प्रतिज्ञालेख ( अफिडेव्हिट ) आमच्यासमोर दाखल केला आहे, व मुकदमा परत निकालासाठीं खालच्या कोर्टाकडे पाठविण्यांत यावा अशी मागणी मागितली आहे. ती मागणी मान्य करावी किंवा काय हें आपल्याला अपिलांत पहावयाचें आहे.

मंचरम्मानें जसा प्रतिज्ञालेख दाखल केला आहे, तसा प्रतिज्ञालेख सत्यनारायणानें दाखल केलेला नाहीं. मंचरम्माच्या प्रतिज्ञालेखांतील मजकूर खोटा असतां तर सत्यनारायणनें स्वतः उलट प्रतिज्ञालेख दाखल केला असता. ज्याअर्थी सत्यनारायणनें तसा प्रतिज्ञालेख दाखल केला नाहीं, त्याअर्थी मंचरम्माच्या प्रतिज्ञालेखांतील मजकूर सर्वस्वी खोटा नाहीं हें उघड आहे. मंचरम्माचें म्हणणें जर खरें असेल, तर तिला हक्कानें सत्यनारायणपाशीं राहण्याचें नाकारतां येईल.

१९४६ सालीं मध्यवर्ती सरकारनें एक कायदा केला आहे. त्या कायद्यानें विवाहित हिंदू स्त्रियांना नवऱ्यापासून वेगळे राहून पोटगी मागण्याचा हक्क दिला आहे. हिंदू स्त्रीला नवऱ्याविरुद्ध पुढील कारणासाठीं तो हक्क बजावतां येतो—

(१) लज्जास्पद रोग होणें,

(२) निर्दयपणें वागवणें,

(३) टाकून देणें,

(४) पुन्हा दुसरें लग्न करणें,

(५) धर्मांतर करणें,

(६) रखेली ठेवणें व

(७) इतर कोणतेहि योग्य कारण.

मंचरम्मानें वरील कायद्याचा आधार घेतला आहे. तो कायदा तिचें लग्न झाल्यानंतर अमलांत आला असला, तरी तिला त्या कायद्याचा आधार घेतां येतो, असें आमचें मत आहे. वर जी कारणें दाखविलीं आहेत, त्यांतील नं. ७ च्या कारणाचा आधार मंचरम्माला घेतां येतो. तें कारण फार व्यापक आहे.

मंचरम्मानें दाखल केलेल्या प्रतिज्ञालेखांतील मजकूर जर खरा असेल तर तिला नं. ७ चा आधार घेऊन सत्यनारायणपासून वेगळे राहण्याचा व पोटगी मागण्याचा हक्क प्राप्त होईल. खालच्या कोर्टात पुरावा वगैरे झाला नसल्यामुळें मंचरम्माचें म्हणणें खरें आहे किंवा कसें हें आपल्याला सांगतां येत नाहीं. पुरावा घेणें अत्यंत गरजेचें आहे.

वरील कारणास्तव आम्ही हे अपील मंजूर करून मुकदमा खालच्या कोर्टाकडे परत चौकशीसाठीं पाठवितों. खालच्या कोर्टानें आम्ही वर दर्शविल्या-प्रमाणें परत चौकशी करून कायद्यानुसार आपला निकाल द्यावा.

( १९५० ऑल इंडिया रिपोर्टर मद्रास पान, ३५६ मंचरम्मा वि. सत्यनारायण. )

# ११

# दोन महत्त्वाचे कज्जे

मल्लवा ही शिद्दप्पाची लग्नाची बायको होती. त्यांचें लग्न १९१६ सालीं झालें होतें मल्लवाला मैत्रा नांवाची एक मुलगी होती. १९३३ पर्यंत मल्लवा व शिद्दप्पा यांचा संसार सुखानें चालला होता. १९३३ सालांत शिद्दप्पानें एक रखेली ठेवली. त्या रखेलीसाठीं त्यानें स्वतंत्र घर घेतलें व त्या घरांतच तिची सर्व व्यवस्था केली. शिद्दप्पा सर्वस्वी त्या रखेलीच्या नादीं लागला. रखेलीमुळें नवराबायकोंत नेहमीं भांडणें होऊं लागलीं. शिद्दप्पाच्या वागणुकीमुळें मल्लवाला अतिशय त्रास होऊं लागला म्हणून ती घर सोडून चालती झाली. वेगळी राहूं लागल्यानंतर तिला आपल्या मुलीच्या लग्नाची काळजी लागली. मल्लवा वेगळी राहत होती; तरी शिद्दप्पानें मात्र तिच्या पोटगीची कांहींच व्यवस्था केली नव्हती. सबब १९४४ सालांत मल्लवानें शिद्दप्पावर पोटगीसाठीं द. म. रु. २५० मागितले. त्याच प्रमाणें मुलीच्या लग्नाप्रीत्यर्थ ५००० रु. ची मागणीही तिनें त्या दाव्यांत केली होती. अव्वल कोर्टानें मल्लवाची पोटगीची मागणी नामंजूर केली; परंतु तिच्या मुलीला द. म. ५० रु. प्रमाणें पोटगी व लग्नाप्रीत्यर्थ ३००० रु. शिद्दप्पानें द्यावें असा निकाल दिला. त्या निकालावर मल्लवा व शिद्दप्पा ह्या दोघांनींही अपीलें केलीं. त्या दोन्हीं अपीलांची सुनावणी एकत्रच झाली व पुढीलप्रमाणें निकाल देण्यांत आला.

मल्लवाला पोटगी मागण्याचा हक्क आहे किंवा काय ? हें आपल्याला ह्या अपिलांत पहावयाचें आहे. नवऱ्यानें रखेली ठेवली असल्यामुळें आपण त्याच्यापाशीं राहण्यास तयार नाहीं म्हणून आपल्याला पोटगी मिळाली पाहिजे असें तिचें म्हणणें आहे. नवऱ्यापासून वेगळे राहाण्यास आपणास पुरेसें व समर्थनीय कारण आहे असें बायकोनें सिद्ध केल्या खेरीज तिला नवऱ्यापासून पोटगी मागतां येत नाहीं. प्रस्तुतच्या मुकदम्यांत मल्लवाला तसें कारण आहे किंवा काय हें आतां आपण पाहूं.

**कालमान व प्रचलित परिस्थिती विचारांत घेऊनच समर्थनीय कारण आहे किंवा काय हें आपल्याला ठरविलें पाहिजे.** रखेली ठेवल्याची प्रथा १०० वर्षांपूर्वी इतकी रूढ होती कीं, त्या प्रथेस कोणी आक्षेप घेत नसे व नवऱ्यानें रखेली ठेविली आहे असें कारण दाखवून बायको त्याच्या पासून वेगळी राहूं शकली नसती; परन्तु आतां काळ अगदीं बदलला आहे. सामाजिक रूढीमध्यें क्रांतिकारक बदल झाले आहेत. कायद्यानेंही ते बदल मान्य केले आहेत. हिंदु स्त्रियांना पोटगी मागण्याचा हक्क १९४६ च्या कायद्यानें दिला आहे. नवऱ्यानें रखेली ठेवली असेल तर बायकोला पोटगी मागतां येईल असें त्या कायद्यांत स्पष्ट म्हटलें आहे. **नवऱ्यानें मारझोड केली अथवा छळलें तरच बायकोला वेगळें राहून नवऱ्यापासून पोटगी मागतां येतें असें आजकालच्या परिस्थितींत ठरविणें अगदीं चुकीचें आहे. नवऱ्याच्या घरीं राहिल्यानें बायकोला त्रास होत असेल तरी तिला वेगळें राहून नवऱ्यापासून पोटगी मागतां येतें असें आमचें मत आहे.**

नवऱ्यानें रखेली ठेवली तर तो तिच्यावर प्रेम करील व तिच्या नादीं लागून बायकोकडे दुर्लक्ष करील. बायकोला त्यामुळें प्रत्यक्ष त्रास झाला नाहीं तरी त्यामुळें मानसिक क्लेश होतील व तिच्या स्वाभिमानास धक्का पोंहोंचेल. लग्नाची बायको ह्या नात्यानें जो मान मिळावयास पाहिजे तो न मिळाल्यास बायकोचा स्वाभिमान दुखावला जाईल व अशा परिस्थितींत तिला वेगळें राहून

नवऱ्यापासून पोटगी मागतां येईल. शिद्दप्पानें रखेलीची व्यवस्था स्वतंत्र रीतीनें केली असल्यामुळें त्या रखेलीपासून मल्लवाला मुळींच त्रास नाहीं असा युक्तिवाद करण्यांत आला आहे. परंतु तो युक्तिवाद आम्हांस पटत नाहीं. नवऱ्यानें रखेली ठेवली असेल मग ती कोठेंही ठेवलेली असो-तर बायकोवरील त्याचें प्रेम त्यामुळें कमी झाल्याशिवाय राहणार नाही. बायकोवर प्रेम करण्याऐवजीं तो त्या रखेलीवर प्रेम करूं लागेल. अर्थात् ही परिस्थिति कोणत्याही विवाहित स्त्रीला असह्य होईल.

वरील कारणास्तव आम्ही असें ठरवितों कीं, मल्लवाला वेगळे राहून शिद्दप्पापासून पोटगी मागण्यास पुरेसें व समर्थनीय कारण असल्यामुळें तिला पोटगीची डिक्री मिळाली पाहिजे सबब तिचें हें अपील आम्ही मंजूर करतों व शिद्दप्पाचें अपील नामंजूर करतों.

( ५१ मुंबई लॉ रिपोर्टर— ११ : मल्लप्पा वि० शिद्दप्पा )

## : २ :

"**पावसानें झोडपलें व नवऱ्यानें मारलें, तर कोणाकडे फिर्याद करणार?**" अशी एक म्हण आहे. ही म्हण पत्नीच्या बाबतीत आता खोटी ठरूं पाहत आहे—

क्रिमिनल प्रोसिजर कोडच्या कलम ४८८ अन्वये बायकोनें नवऱ्याविरुद्ध पोटगीसाठीं अर्ज दिला. त्या अर्जावरून मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत कारवाई सुरूं झाली. एके दिवशीं बायको आपल्या वकिलाच्या घरून परत जात असतांना नवऱ्यानें तिला रस्त्यांत गांठलें व तिला मारझोड करून जबरदस्तीनें आपल्या घरीं नेलें. त्यानें तिला तीन दिवस पर्यंत घरांत कोंडून ठेविलें व तिनें जर पोटगीचा अर्ज काढून घेतला नाहीं तर तिचा खून करण्यांत येईल असा धाक दाखविला. बायकोनें तेथून कशीतरी सुटका करून घेतली व झालेला प्रकार कोर्टास कळविला. कोर्टानें दाद घेतली नाहीं म्हणून बायकोनें हायकोर्टांत अर्ज दिला. हायकोर्टानें पुढील प्रमाणें हुकूम दिला.

" कोर्टातील कारवाई निर्धास्तपणें चालविण्याचा हक्क प्रत्यक पक्षकाराला असतो. कोणताही पक्ष विरुद्ध पक्षाच्या न्यायमार्गांत अडथळा आणूं शकत नाहीं. तसा अडथळा आणणें म्हणजेच कोर्टाची बेअदबी करणें होय. बायकोनें पोटगीसाठीं अर्ज दिला होता; तो मंजूर करावा किंवा नाहीं हा प्रश्न निकालांत काढण्याचा पूर्ण अधिकार कोर्टाला होता. बायकोला मारझोड करून पोटगीचा अर्ज काढून घेण्यास भाग पाडण्यासाठीं तिला धाक दाखविण्याचें जें कृत्य नवऱ्यानें केलें आहे असें बायकोचें म्हणणें आहे; त्या कृत्यामुळें कोर्टाची बेअदबी होईल. **बायकोची तक्रार खरी असेल तर नवऱ्याला कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल शिक्षा द्यावी लागेल.** खालच्या कोर्टानें चौकशी करून बायकोची तक्रार निकालांत काढली."

[ १९ ना. लॉ. ज. ( नोटस ) पा. नं. ६३ कौसल्या वि. मारोती ]

# १२

# धर्मांतरानें एक-पत्नीत्वाचें बंधन मोडतां येईल कां ?

प्रश्न :—आपल्या मुंबई प्रांतांत एक-पत्नीत्वाचा कायदा पास झाला आहे पण हा कायदा फक्त हिंदुच्या पुरताच मर्यादित आहे. खरें पाहिलें असतां आपल्या निधर्मी सरकारनें एक-पत्नीत्वाचा कायदा जात, धर्म, पंथ यांचा विचार न करतां सर्व लोकांना लागू करण्यास पाहिजे होता. असें न झाल्यामुळें पुष्कळ लोक नाराज झाले आहेत व व्यवहारांत देखील बरेच घोटाळे निर्माण झाले आहेत. परवा एका हिंदु गृहस्थानें हा कायदा मोडण्याकरितां मोठी नामी युक्ति योजली, त्याचें आपल्या बायकोशीं पटत नव्हते. पण अेक-पत्नीत्वाचा कायदा असल्यामुळें पहिल्या बायकोला घटस्फोट दिल्याशिवाय त्याला दुसरें लग्न करतां येत नव्हतें, केवळ नवरा बायकोचे पटत नाहीं म्हणून बायकोपासून घटस्फोट मागतां येत नाहीं. त्यानें घटस्फोटाचा कायदा खूप वेळां वाचला. पण ज्यायोगें त्यास घटस्फोट मिळूं शकेल असें कोणचेच कारण त्याच्या बाबतींत त्याला मिळूं शकलें नाहीं. त्याची बायको बिचारी गरीब होती. पण ह्या स्वारीला ती आवडत

नव्हती. दुसरें लग्न करावें तर शिक्षा होते, व न करावे तर मनाचा कोंडमारा होतो, या पेचप्रसंगांतून सुटण्याकरितां त्यानें एक और अक्कल लढविली. त्यानें हिंदुधर्माचा त्याग केला व मुसलमान धर्म स्वीकारला. तो धर्म स्वीकारून लगेच दुसऱ्या दिवशीं त्यानें पहिली पत्नी हयात असतांना दुसऱ्या स्त्रीबरोबर राजरोसपणें लग्न केलें. त्याचें कृत्य अत्यंत निंद्य नाहीं कां ? त्याच्या ह्या कृत्याबद्दल तो कायद्याच्या कोर्टांत गुन्हेगार ठरणार नाहीं कां ? धर्मांतर करून एकपत्नीत्वाचा कायदा मोडता येतो हे म्हणणें खरें आहे कां ? या बाबतींत एखादा हायकोर्टाचा ठराव झाला आहे कां ?

उत्तरः—मुंबई सरकारनें जो एक-पत्नीत्वाचा कायदा केला आहे तो मुसलमान लोकांस लागू नसल्यानें एखाद्या हिंदु मनुष्यानें पहिली पत्नि हयात असतांना मुसलमान धर्म स्वीकारून जर दुसरें लग्न केले तर तो दोषी ठरणार नाहीं. मद्रास हायकोर्टानें नुकताच एक कज्जा निर्णीत केला आहे. त्यामध्यें असें म्हटलें आहे कीं ज्या धर्माचा स्वीकार एखाद्या मनुष्यानें केला असेल त्या धर्मानें दिलेला हक्क त्या मनुष्यास मिळतात. मद्रास हायकोर्टानें जें तत्त्व सांगितलें आहे, त्यावरून असें कळून येईल कीं, तुम्ही जी हकिकत सांगता त्या गृहस्थाचें कृत्य लौकिकदृष्ट्या कितीहि निंद्य असलें तरी कायद्याच्या दृष्टीनें तो दोषी नाहीं. मद्रासमध्यें अेका मनुष्यानें ख्रिश्चन धर्म स्वीकारून एका ख्रिश्चन स्त्रीशीं लग्न केलें होतें. ख्रिश्चन मनुष्यानें एक पत्नी जिवंत असतांना दुसरें लग्न केलें तर त्याला शिक्षा होते कारण त्या लोकांत अेक-पत्नीत्वाचा कायदा आहे. हा कायदा टाळण्याकरितां त्यानें ख्रिश्चन पत्नी जिवंत असतांना हिन्दु धर्माचा स्वीकार केला व अेका हिंदु स्त्रीशीं लग्न केलें. मद्रासमध्यें हिंदु लोकांना अेकाहून अधिक बायका करण्याची परवानगी असल्यानें आपण कायद्याप्रमाणें दोषी नाहीं असें त्याचें म्हणणें होतें. हा कज्जा अत्यंत महत्त्वाचा गणला गेला आहे. त्याची हकिकत व निकाल थोडक्यांत खालीं दिला आहे, तो पाहून तुमच्या प्रश्नाचें देखील उत्तर तुम्हांला मिळूं शकेल. त्या कज्जाचें नांव

# मार्थम्मल विरुद्ध मुनुस्वामी

[ १९५१ ऑल इंडिया रिपोर्टर, मद्रास, पान ८८८ ]

मार्थम्मल ही अेक ख्रिश्चन शाळामास्तरीण. होती. तिचें वय २९ वर्षांचें होतें. मुनुस्वामी नांवाच्या १८ वर्षांच्या अेका हिंदु विद्यार्थ्याशीं तिची ओळख झाली. तिचें त्याच्यावर अतिशय प्रेम जडलें. तिला त्याच्यावांचून अगदीं चैन पडेना. ती उघडपणें त्याच्याशीं व्यभिचार करूं लागली. तिचा बाप, तिचा भाऊ वगैरे आप्तांनीं त्या प्रकाराबाबत तिची कानउघाडणी केली; परन्तु तिनें तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. मुनुस्वामीशीं तिचा व्यभिचार चालूच राहिला. त्या प्रकारास आळा कसा घालावा हें तिच्या आप्तांना कळेना, शेवटीं त्या दोघांचें लग्न करून द्यावें असें ठरलें. मार्थम्मल ही ख्रिश्चन होती व मुनुस्वामी हिन्दु होता. मुनुस्वामीनें ख्रिश्चन धर्माचा स्वीकार करावा असें ठरलें. त्याप्रमाणें त्याला चर्चमध्यें धर्मगुरुकडून ख्रिश्चन धर्माची दीक्षा देण्यांत आली. मुनुस्वामीच्या आईबापांना ह्या गोष्टीचा सुगावा लागला नाहीं. मुनुस्वामी ख्रिश्चन झाल्यावर ख्रिश्चन धर्मानुसार त्याचें लग्न मार्थम्मलशीं लावण्यांत आलें. मुनुस्वामीच्या आईबापांना ह्याही गोष्टीचा सुगावा लागला नव्हता. त्यांना न कळवितां व त्यांच्या गैरहजेरींत सर्व प्रकार झाला. लग्नानंतर मुनुस्वामी मार्थम्मलशीं कांहीं दिवस राहिला. नंतर त्याला कंटाळा येऊं लागला. त्यानें वेगळें राहण्यास सुरवात केली. मार्थम्मलला त्याचा विरह असह्य झाला. तिनें त्याला अनेक केविलवाणी पत्रें लिहिलीं. मला तूं पाहिजे आहेस. तुझी अिच्छा असेल तर मी आपल्या बहिणीशी अथवा अितर एखाद्या मुलीशीं तुझें लग्न लावून देण्यास तयार आहे, परन्तु तुझ्या वांचून मी जगूं शकत नाहीं व कसेंही करून तूं माझ्यापाशीं येऊन रहा अशा आशयाचा मजकूर त्या पत्रांत होता. आपण वाटेल तें देण्यास व हिंदु मुलीशीं लग्न लावून देण्यास तयार आहों परन्तु तूं माझ्याजवळ येवून रहा अशी विनंती पत्रांत करण्यात आली होती. मी तुझ्यासाठीं अेक मुलगी पाहून ठेवली आहे. तिच्या सहवासात तूं अेखाद्या हॉटेलांत वाटल्यास २४ तास घालव व ती पसंत असल्यास तिच्याशीं

लग्न कर पण मला सोडूं नको असें आमिषही तिनें अेका पत्रांत दाखविलें होतें. त्या केविलवाण्या पत्रांचा परिणाम मुनुस्वामीवर झाला व तो पूर्ववत् तिच्याशीं संबंध चालू ठेवूं लागला. मार्थम्मलला त्याच्यापासून अेक मुलगा झाला. त्यानंतर मुनुस्वामीनें मार्थम्मलला सोडून दिलें व सरोजिनी नांवाच्या एकां तरुण हिंदु मुलीशीं लग्न केलें. तें लग्न हिन्दु पद्धतीनें झालें. त्या लग्नांत मुनुस्वामी व सरोजिनी ह्या दोघांचीही आप्तमंडळी हजर होती. मुनुस्वामी ख्रिश्चन झाला आहे व त्याचें एका ख्रिश्चन बाअीशीं लग्न झाले आहे हें त्यापैकीं कोणालाच माहीत नव्हतें. सरोजिनीशीं लग्न झाल्यावर मार्थम्मलनें मुनुस्वामी व त्याचा बाप आणि भाऊ ह्या तिघांवर पीनल कोडच्या क. ४९४, ४९५ व ४९६ अन्वयें खटला भरला. त्या खटल्यांत अव्वल कोर्टानें त्या तिघांनाही सोडून दिलें म्हणून मार्थम्मलनें हा तपासणी अर्ज केला होता.

आरोपींनीं कलम ४९४ ( नवरा अगर बायको जिवंत असतांना दुसरें लग्न करणें. ) कलम ४९५ ( ज्याच्याशीं दुसरें लग्न करावयाचें त्याच्यापासून पूर्वी लग्न झालें आहे. ही गोष्ट लपवून ठेवणें. ) व कलम ४९६ ( कायदेशीररित्या लग्न झालें नसतांना कपटानें लग्न करण्याचें सोंग करणें. ) अन्वयें गुन्हा केला आहे किंवा काय हें आपल्याला पहावयाचें आहे.

मुनुस्वामी हा आरोपी नं. १ आहे. आरोपी नं. २ व ३ याना खालच्या कोर्टानें सोडून दिलें तेंच बरोबर केलें; कारण कीं, ते दोघेहि लग्नाच्या वेळीं हजर नव्हतें व त्यांना मागची सर्व भानगड माहीत नव्हती. आतां आपल्याला फक्त मुनुस्वामीविषयीं विचार करावयाचा आहे.

मुनुस्वामी ख्रिश्चन झाला होता व ख्रिश्चन बाअीशीं ( मार्थम्मल ) त्यांचें लग्न झालें होतें. व मार्थम्मल जिवंत असल्याकारणानें तिला घटस्फोट दिल्याखेरीज मुनुस्वामीला दुसरें लग्न करतां येत नव्हते व ज्या अर्थी त्यानें दुसरें लग्न केलें आहे त्याअर्थीं त्यानें पीनल कोडच्या वरील कलमान्वयें गुन्हा केला आहे. असा युक्तिवाद मार्थम्मलतर्फे करण्यांत आला आहे. हा युक्तिवाद आम्हांला मान्य नाहीं. एक बायको जिवंत असतांना दुसरी बायको करण्यास ख्रिश्चन धर्मानें मनाई केली आहे. असें जरी गृहीत धरलें तरी नवऱ्यानें त्या

धर्माचा त्याग करून ज्या धर्मानें अनेक बायका करण्याची मोकळीक ठेवली आहे, त्या धर्माचा स्वीकार केल्यास तो बंधननष्ट होईल, व त्यालाही अनेक बायका करतां येतील. मुनुस्वामीनें तात्पुरता ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला होता. त्यानंतर त्यानें परत हिंदुधर्माचा स्वीकार केला ही गोष्ट हिंदु पद्धतीनें झालेल्या त्याच्या लग्नावरून सिद्ध होते. हिंदुस्थान हें आतां धर्मातीत राष्ट्र आहे. वाटेल तो धर्म स्वीकारण्याची पूर्ण मोकळीक आहे. एवढेच नव्हे तर हिंदुस्थानच्या नागरिकावर धर्माच्या बाबतींत कोणतेंच बंधन नाहीं. हिंदु धर्मांत परत येण्यासाठीं कांहीं विशिष्ट विधि करण्याची आवश्यकता नसते. हिंदु धर्मांत परत येणाऱ्या इसमास हिन्दु समाजानें हिन्दु म्हणून मान्य केलें कीं झालें. मुनुस्वामीला तशी मान्यता मिळाली होती. याचा अर्थ असा कीं मुनुस्वामी पुन्हां हिन्दु झाला होता. हिन्दु झाल्यामुळें त्याला वाटेल तितक्या बायका करण्याचा आधिकार प्राप्त झाला होता. हिन्दु धर्मांत परत आलेल्यांचीं अनेक उदाहरणें इतिहासांत आहेत. उदाहरणार्थ नेताजी पालकर, बजाजी निंबाळकर वगैरे. त्यांना मुसलमानी धर्माची दीक्षा देण्यांत आली होती व मुसलमान स्त्रियांशीं त्यांचीं लग्नें लावण्यांत आलीं होतीं. परन्तु त्यानंतर त्यांना हिन्दुधर्मांत परत घेण्यांत आलें व हिन्दु स्त्रियांशीं त्यांचीं लग्नें लावण्यांत आलीं. हें उदाहरण मुनुस्वामीच्या बाबतींत लावण्यास कांहींच हरकत नाहीं. खरें पाहिलें असतां मुनुस्वामी नाममात्र ख्रिश्चन झाला होता. त्यानें आपलें जुनेच नांव कायम ठेवलें होतें. हिंदूंचे सण व आचार विचार तो पाळीत होता व आपल्या हिन्दु आप्तांशीं रहात होता. असो. मुनुस्वामी ख्रिश्चन झाला होता असें जरी गृहीत धरलें तरी त्यानें सरोजिनीशी लग्न करतांना त्या धर्माचा त्याग केला होता असें सिद्ध झालें आहे. त्याला सोडून देण्यांत खालच्या कोर्टानेंही चूक केली नाहीं. वरील कारणास्तव आम्ही हा तपासणी अर्ज फेटाळून लावतो.

—–×✻×–—

# १३

# मुंजीच्या वेळीं लोकांना दिलेलें आईस्क्रीम!

प्रिय मालती !

तुझें पत्र पोंचलें. तुझें पत्र वाचून कोणाचीही करमणूक होईल. तुझ्या एक नातेवाईकाच्या घरीं मुंजीच्या वेळीं लोकांना आईस्क्रीम दिलें म्हणून खटला झाला व त्या खटल्यांत दंड झाला हें पाहून तूं खूप संतापलेली दिसतेस 'कायदा गाढव आहे' व असले कायदे करणारे लोक महामूर्ख आहेत अशा समजुतीनें तूं पत्र लिहिलें आहेस. रागानें भरलेल्या या तुझ्या पत्रामध्यें तूं कांहीं कायद्याचें प्रश्न मला विचारले आहेस. तुझें म्हणणें असें आहे कीं, खाद्यपदार्थ या सदरांत दुधाचा पदार्थ कदापि येऊं शकत नाहीं, व यामुळें प्रांतिक सरकारनें काढलेला जाहीरनामा कायदेशीर ठरत नाहीं. तुला जें कायद्याचें ज्ञान आहे त्यावरून तुझी अशी समजूत झालेली दिसते कीं, वरील दोन मुद्दे वरच्या कोर्टांत व्यवस्थितपणें मांडल्यास खालच्या कोर्टाचा निकाल रद्द होईल.

तूं उपस्थित केलेलें कायद्याचे मुद्दे सुतराम् विचार करण्यासारखे आहेत. याबाबतींत मुंबई हायकोर्टानें नुकताच एक निकाल दिला आहे. त्याची हकीकत मी या खालीं देत आहे. म्हणजे त्यावरून तूं उपस्थित केलेल्या प्रश्नांचें उत्तर तुला मिळूं शकेल. त्या कज्जाचें नांव—

‘ मुंबई सरकार वि॥ जाल. के. पटेल ’

[ ऑ. इं. रि. मुंबई २०३ ] असें आहे.

त्याची थोडक्यांत हकीकत अशी:—

मुंबई सरकारनें ता. २४-१-१९४७ रोजीं एक जाहीरनामा काढला. कोणत्याही इसमाला, आवश्यक तो परवाना घेतल्याखेरीज, आईस्क्रीमसाठीं दुधाचा उपयोग करतां येणार नाहीं व दुधापासून तयार झालेलें आईस्क्रीम कोणत्याही ठिकाणीं वाटतां येणार नाहीं अथवा विकतां येणार नाहीं, असें त्या जाहीरनाम्यांत म्हटलें होतें. तो जाहीरनामा आवश्यक वस्तूंच्या पुरवठ्याबाबतच्या (तात्पुरते अधिकार) १९४६ च्या कायद्याच्या क. ३ (२) (ड) अन्वयें काढण्यांत आला होता. आवश्यक वस्तूंबाबतचे हुकूम काढण्याचा अधिकार त्या कलमान्वयें मध्यवर्तीय सरकारला देण्यांत आला होता. “आवश्यक वस्तु” ह्या शब्दाची व्याख्या त्याच कायद्याच्या क. २ मध्यें देण्यांत आली होती. “आवश्यक वस्तु” ह्या सदरांत खाद्य पदार्थांचा समावेश होईल, असा खुलासा त्या व्याख्येंत करण्यांत आला होता. आवश्यक वस्तू संबंधींचे हुकूम काढण्याचा अधिकार मध्यवर्तीय सरकार प्रांतिक सरकारला देऊं शकेल असा खुलासा त्याच कायद्याच्या क. ४ मध्यें करण्यांत आला होता. वरील कलमानुसार मध्यवर्तीय सरकारनें प्रांतिक सरकारला अधिकार दिला होता. व त्या अधिकारांत मुंबई सरकारनें ता. २४-१-४७ रोजीं हुकुम काढल्यामुळें आईस्क्रीमबाबत दुधाचा उपयोग करतां येत नव्हता व दुधापासून तयार झालेलें आईस्क्रीम विकतां वगैरे येत नव्हतें.

एका इसमाच्या घरीं मौज झाली. त्यानिमित्त त्यानें आपल्या मित्रमंडळीला अल्पोपहार देण्याचें ठरविलें. अल्पोपहारासाठीं लागणाऱ्या वस्तू पुरविण्याचा मक्ता त्यानें जाल. के. पटेल ह्या नांवाच्या इसमाला दिला. अल्पोपहारासाठीं निश्चित केलेल्या वस्तूंच्या यादींत आईस्क्रीमचाही समावेश करण्यांत आला होता. मक्त्यानुसार जाल. के. पटेलनें अल्पोपहारासाठीं आईस्क्रीम दिलें तें आईस्क्रीम दुधाचें होतें व त्याबाबत लागणारा परवाना जाल. के. पटेलनें घेतला नव्हता.

ता. २४-१-४६ च्या जाहीरनाम्याचा भंग करून आईस्क्रीम विकल्याबद्दल मुंबई सरकारनें जाल. के. पटेलवर खटला भरला.

आपण आईस्क्रीम दिलें नाहीं व ता. २४-१-४७ चा जाहीरनामा काढण्याचा अधिकार मुंबई सरकारला नसल्यामुळें त्या जाहीरनाम्याचा भंग केल्याबद्दल आपल्याला शिक्षा होऊं शकत नाहीं, अशा दोन हरकती जाल. के. पटेलनें घेतल्या. अव्वल कोर्टानें त्या दोन्ही हरकती मंजूर करून जाल. के. पटेलला सोडून दिलें, त्यावर मुंबई सरकारनें हें अपील केलें होतें.

ता. २४-१-४७ चा जाहीरनामा काढण्याचा अधिकार मुंबई सरकारला होता किंवा नाहीं हें आपल्याला ह्या अपीलांत पहावयाचें आहे.

फक्त खाद्यपदार्थांच्या बाबतींत जाहीरनामा काढण्याचा अधिकार प्रांतिक सरकारांना १९४६ च्या कायद्यान्वयें देण्यांत आला होता परन्तु 'दुध' हा 'खाद्य पदार्थ' नसल्यामुळें त्याबाबत मुंबई सरकारनें ता. २४-१-४७ ला काढलेला जाहीरनामा अधिकाराबाहेरचा व बेकायदेशीर आहे असा युक्तीवाद आरोपीतर्फे करण्यांत आला आहे. हा युक्तिवाद साधार आहे किंवा नाहीं हें आतां आपण पाहूं.

"खाद्य पदार्थ" (food stuffs) ह्या शब्दाचा अर्थ, खाण्यासाठीं जिचा उपयोग केला जातो अशी वस्तू, खाण्यास योग्य असलेली वस्तु, जिच्यामुळें शरीराचें पोषण होतें अशी वस्तु, असा करण्यांत आला आहे. कांहीं ठिकाणीं जी वस्तु फक्त खातां येतें, पिता येत नाहीं, असाही करण्यांत आला आहे. दूध ही पिण्याची वस्तू असल्यामुळें "खाद्य पदार्थ" ह्या सदरांत तिचा समावेश होत नाहीं व म्हणून दुधाबाबतचा जाहीरनामा अधिकाराबाहेरचा व बेकायदेशीर

ठरतो, असा आरोपीतर्फे युक्तिवाद करण्यांत आला आहे. चहा ही पिण्याची वस्तू असल्यामुळें "खाद्य पदार्थ" ह्या सदरांत चहाचा समावेश होत नाहीं, असें परदेशांतील एका निवाड्यांत ठरविण्यांत आलें आहे व त्या निवाड्यावर आरोपीतर्फे भिस्त ठेवण्यांत आली आहे.

जिच्यामुळें शरीराचें पोषण होतें अशा वस्तूंचा समावेश "खाद्य पदार्थ" ह्या सदरांत होतो. ह्याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाहीं. ती वस्तू खाण्याचीच असली पाहिजे, पिण्याची नसली पाहिजे, ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. दूध ही पिण्याची वस्तु असली तरी तिच्यामुळें शरीराचें पोषण होतें हें सर्वांस ठाऊकच आहे. लहान मुलें व आजारी माणसें यांचें खाद्य दूध हेंच असतें. सबब "खाद्य पदार्थ" ह्या सदरांत दुधाचा समावेश होतो. व ता. २४।१।४७ चा जाहीरनामा काढण्याचा अधिकार मुंबई सरकारला होता, असें आम्हीं ठरवितों. आरोपीनें त्या जाहीरनाम्याचा भंग केला असल्यामुळें तो शिक्षेस पात्र ठरतो हें उघड आहे. जाहीरनाम्याचा भंग करणाऱ्या इसमास कैदेची शिक्षा दिलीच पाहिजे असा त्या जाहीरनाम्यात उल्लेख आहे.

आरोपीला शिक्षा देण्यांत यावी या उद्देशानें मुंबई सरकारनें प्रस्तुतचें अपील केलें नसून ता. २४।१।४७ चा जाहीरनामा काढण्याचा अधिकार मुंबई सरकारला होता किंवा नाही हा प्रश्न निकालांत काढून घेण्याच्या उद्देशानें प्रस्तुतचें अपील दाखल करण्यांत आलें आहे. सबब आरोपीला सौम्य शिक्षा दिल्यानेंही काम भागेल, असें आम्हांस वाटतें व म्हणून आम्हीं आरोपीला फक्त एक दिवसाची कैद व २०० रुपये दंड अशी शिक्षा देवून हें अपील मंजूर करतों...........असो.

विशेष काय लिहिणें ?

तुझा,

**माधव.**

---

# १४

# नुकसान-भरपाई

परवां एका गांवीं चर्चा मंडळातर्फे असा प्रश्न उपस्थित केला गेला कीं-

एखाद्या बाईचा नवरा जर मरण पावला व त्याचे मरणास एखाद्या डॉक्टरचा निष्काळजीपणा कारणीभूत झाला तर त्या डॉक्टरनें त्या बाईला नुकसान भरपाई देणें वाजवी नाहीं काय?

ह्या प्रश्नावर ज्या निरनिराळ्या वक्त्यांचीं भाषणें झालीं तीं पाहतां असें दिसतें की, बऱ्याच वक्त्यांना जरूर ती कायद्याची माहिती नाहीं. या बाबतींत एका प्रख्यात खटल्याची हकीगत सांगितली म्हणजे जरूर ती माहिती मिळूं शकेल. ती हकीगत थोडक्यांत अशी—

इंग्लंडांतील किंग्ज बेंच डिव्हिजन समोर एक अत्यंत खळबळकारक खटला चालूं होता. सार्वजनिक दवाखान्यांतील डॉक्टरांच्या निष्काळजीपणामुळें जर दवाखान्यांत उपचारासाठीं आलेला रोगी दगावला तर त्यास जबाबदार कोण, असा

मुद्दा त्या खटल्यांत उपस्थित झाला होता. त्या खटल्याची थोडक्यांत हकीगत अशी होती—

एका काऊंटी कौन्सिलचा एक सार्वजनिक दवाखाना होता. काऊंटी कौन्सिलनें त्या दवाखान्यांत एक अत्यत निष्णात शस्त्रवैद्य नेमला होता. त्या शस्त्रवैद्याचें नांव डॉ. हंट असें होतें. डॉ. हंट हे एक प्रख्यात शस्त्रवैद्य असल्यामुळें अनेक ठिकाणांहून त्या दवाखान्यांत शस्त्रक्रिया करवून घेण्यासाठीं रोगी येत. जेम्स कॉलिन्स ह्या नांवाचा एक रोगी आपल्या जबड्यावर शस्त्रक्रिया करवून घेण्यासाठीं त्या दवाखान्यांत आला. ती शस्त्रक्रिया फार कठीण होती. डॉ. हंट ह्यांना मदत करण्यासाठीं मिस् नाईट ह्या नांवाची एक अनभिज्ञ डॉक्टरीण नेमण्यांत आली होती. शस्त्रक्रियेसाठीं लागणारीं औषधें व इतर साहित्य तयार करून ठेवणें हें तिचें कर्तव्य होतें. जेम्स कॉलिन्सवर शस्त्रक्रिया करण्याच्या आदल्या दिवशीं मिस् नाईटनें डॉ. हंटला टेलिफोन करून जेम्सच्या शस्त्रक्रियेसाठीं कोणकोणतीं औषधें व साहित्य लागेल ह्याची माहिती विचारली. डॉ. हंटनें टेलिफोननें मिस् नाईटला माहिती दिली. ती माहिती मिस् नाईटनें एका कागदावर टिपून घेतली. तिच्या ऐकण्यांत फरक झाला म्हणून म्हणा अथवा इतर कांहीं कारणांमुळें म्हणा, तिनें एका औषधाचें नांव प्रोकेन ऐवजीं कोकेन असें लिहून घेतलें. कागदावर टिपून घेतलेलीं औषधें तिनें औषध विक्रेत्याकडून मागविलीं. कोकेन हें एक भयंकर विष असतें. शिवाय एका इसमाचा प्राण घेण्यास जेवढें कोकेन लागलें असतें त्याच्या पांचपट कोकेन तिनें मागविलें. मिस् नाईट ही स्वतः डॉक्टरीण असल्यामुळें डॉ. हंटनें सांगितलें तेवढें कोकेन जर एखाद्या इसमाच्या शरीरांत घातलें तर त्या इसमाचा ताबडतोब प्राण जाईल हें तिला ठाऊक होतें, परन्तु तिनें मुळीं विचारच केला नाहीं. औषध विक्रेत्यानेंही डॉक्टरच्या सहीशिवाय तेवढें कोकेन द्यावयास नको होतें. परन्तु औषध विक्रेत्यानेंही निष्काळजीपणानें डॉक्टरच्या सहीशिवाय मिस् नाईटला कोकेन दिलें. ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं शस्त्रक्रिया सुरूं झाली. शस्त्रक्रियेपूर्वी रोग्याला गुंगीचें औषध, द्यावयाचें असतें. त्यासाठींच डॉ. हंटनें प्रोकेन नांवाचें औषध तयार ठेवण्यास मिस् नाईटला सांगितलें

होतें. परंतु प्रोकेन ऐवजीं तिनें कोकेन तयार ठेवलें होतें. डॉ. हंटनें शस्त्रक्रियेच्या वेळीं गुंगीचें औषध मागितलें. मिस् नाईटनें तयार ठेवलेल्या औषधांतून नर्सनें डॉ. हंटला कोकेन दिलें. तें कोकेन डॉ. हंटनें पिचकारींत भरलें व सुईच्या द्वारें जेम्स् कॉलिन्सच्या शरीरांत घातलें. पिचकारींत घातलेलें औषध कोकेन आहे कीं, प्रोकेन आहे ह्याविषयीची तपासणी डॉ. हंटनें केली नाहीं कोकेनच्या जबर इंजेक्शनचा जो व्हावयाचा तोच परिणाम झाला. कोकेन शरीरांत गेल्याबरोबर जेम्स कॉलिन्सचा प्राण गेला.

काऊंटी कौन्सिल व डॉ. हट ह्या दोघांवरही जेम्स कॉलिन्सच्या बायकोनें नुकसान भरपाईसाठीं दावा लावला. काऊन्टी कौन्सिल व डॉ. हंट ह्या दोघाच्या निष्काळजी पणामुळें जेम्स कॉलिन्स्ला मृत्यु आला असें तिचें म्हणणें होतें. डॉ. हंट हे काऊन्टी कौन्सिलचे नोकर असल्यामुळें त्यांच्या निष्काळजीपणामुळें झालेल्या नुकसानीची जबाबदारी काऊंटी कौन्सिलवर आहे, असें जेम्स कॉलिन्सच्या बायकोचें म्हणणें होतें.

किंग्ज् बेंच डिव्हिजननें काऊन्टी कौन्सिल व डॉ. हट ह्या दोघांनाहि निष्काळजीपणाच्या सबबीवर जबाबदार धरलें व जेम्स कॉलिन्सच्या विधवा बायकोला २५०० पौंडाची नुकसान भरपाई दिली. अर्धी रक्कम काऊंटी कौन्सिलनें द्यावी व अर्धी रक्कम डॉ. हंटनें द्यावी, असें ठरविण्यांत आलें.

( १ ऑल इंग्लंड लॉ रिपोर्टस् ६३३; कॉलिन्स वि० हर्टफर्डशायर काऊंटी कौन्सिल. )

# १५

# देशमुख-कायदा

देशमुख कायद्यानें हिंदु स्त्रियांना कांहीं अधिकार दिले आहेत. या कायद्या-प्रमाणें हिंदु विधवेला नवऱ्याच्या मृत्यूनंतर कुटुंबाचे इस्टेटीत हिस्सा मागतां येतो-

अशा प्रकारें हिंदु विधवेला मिळणारा हिस्सा केव्हां ठरविणेंचा असतो? दाव्याचे वेळची परिस्थिति लक्षांत घेऊन हिस्सा ठरविणेंचा का नवऱ्याचे मृत्यूचे वेळची परिस्थिति लक्षांत घेऊन हिस्सा ठरविणेंचा? ह्याबद्दल बराच वाद आहे.

या बाबतींत एक अत्यंत महत्त्वाचा कज्जा निर्णित झाला आहे. त्या कज्जाची हकीगत अशी—

रामप्रसाद हा एका अविभक्त हिंदु कुंटुबाचा मुख्य पुरुष होता. त्याला लखमीचंद, गुरुदयाल व तुलसीराम अशीं तीन मुलें होतीं व एक बायको होती. लखमीचंदला बदरीप्रसाद ह्या नांवाचा एक मुलगा होता. लखमीचंद १९१९ मध्यें मरण पावला. त्यानंतर म्हणजे १९२६ सालांत रामप्रसाद मरण पावला. रामप्रसादची बायको मात्र जिवंत होती. बद्रीप्रसाद १९३९ सालांत मरण पावला. त्याच्या बायकोचें नांव सारजू होतें. सारजूनें १९४३ सालांत कुटुंबाच्या इस्टेटीसाठीं दावा लावला. त्या दाव्यांत तिनें स्वतःसाठीं इस्टेटीचा $\frac{१}{३}$ हिस्सा

मागितला होता. गुरुदयाळ वगैरेंचें म्हणणें असें होतें कीं, तिला फक्त १/४ हिस्सा मिळाला पाहिजे. खालच्या दोन्हीं कोर्टांनीं सारजूला एक तृतियांश हिस्सा दिला म्हणून गुरूदयाळ वगैरेंनीं हें अपील केलें होतें.

सारजूला १/३ हिस्सा मिळूं शकतो कीं, १/४ हें आपल्याला ह्या अपीलांत पहावयाचें आहे.

गुरुदयालचे म्हणणें असें आहे कीं, सारजूला किती हिस्सा द्यावा हें तिच्या नवऱ्याच्या मृत्यूच्या वेळच्या परिस्थितीवरून ठरविलें पाहिजे. सारजूचा नवरा बद्रीप्रसाद १९३९ सालांत मरण पावला. त्यावेळीं जर वाटणीचा दावा लावला गेला असता तर इस्टेटीचे चार हिस्से झाले असते व सारजू, गुरुदयाल, तुलसीराम व रामप्रसादची बायको ह्यांना प्रत्येकीं, १/४ हिस्सा मिळाला असता.

हा युक्तिवाद आम्हांला पटत नाहीं. जोंपर्यंत हिस्सा विभक्त करून विधवेच्या ताब्यांत देण्यांत येत नाहीं, तोंपर्यंत हिश्श्याचा प्रश्न उपस्थित होत नसतो, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. तिचा हिस्सा विभक्त होऊन तिच्या ताब्यात देण्यांत येण्यापूर्वींच जर ती मरण पावली तर मरणापूर्वीं तिला हिस्सा मागण्याचा एक हक्क होता असेंच म्हटलें पाहिजे. सबब १९३९ सालांत वाटणीचा दावा लावण्यांत आला असता तर कोणाला किती हिस्सा मिळाला असता हें पाहण्याची आपल्याला गरज नाहीं. दुसरें असें कीं, कुटुंब विभक्त होण्यापूर्वींच रामप्रसादची बायको मरण पावली असल्यामुळें तिच्या विषयीं विचार करण्याची आपल्याला मुळींच गरज नाहीं.

आतां आपण सारजूच्या हक्काकडे वळूं. स्त्रियांच्या मिळकतीवरील हक्का-बाबतच्या कायद्याच्या क. ३ (२) अन्वयें सारजूला हिस्सा दिला पाहिजे. त्या कलमांत असें म्हटलें आहे कीं, कुटुंबाच्या इस्टेटींत ज्याचा हितसंबंध आहे, असा इसम मरण पावला असेल, तर त्याला जो हितसंबंध होता तो हितसंबंध त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या बायकोला प्राप्त होईल. त्या कलमांत "हिस्सा" हा शब्द वापरण्यांत आलेला नाहीं व त्याचें कारण उघड आहे. जोपर्यंत प्रत्यक्ष वांटणी होत नाहीं तोंपर्यंत अविभक्त कुटुंबांतील घटकाला कुटुबाच्या इस्टेटींत

अमुकच हिस्सा आहे असें मानतां येणार नाहीं; कारण कीं, कुटुंबांतील जन्म व मृत्यू ह्यामुळें हिश्यांत घट अथवा वाढ होऊं शकते. सबब जोपर्यंत प्रत्यक्ष वांटणी होत नाहीं तोंपर्यंत कुटुंबांतील घटकांना ठराविक हिस्सा मागण्याचा हक्क नसतो; तो हक्क त्याच्या मृत्युनंतर त्याच्या बायकोला प्राप्त होत असतो. नवऱ्याच्या स्वतंत्र इस्टेटींत मुलाला जेवढा हिस्सा मिळाला असता तेवढाच हिस्सा बायकोला मिळतो असें क. ३ (१) मध्यें म्हटलें आहे. क. ३ (१) मध्यें "हिस्सा" व क. ३ (२) मध्यें "हितसबंध" असें दोन स्वतंत्र शब्द वापरण्यांत आले आहेत. त्या दोहोंत फार महत्त्वाचा फरक आहे. वादांतील इस्टेट समायिक असल्याकारणानें बद्रीप्रसादला त्या इस्टेटींत जो हितसंबंध होता तोच हितसंबंध सारजूला मिळाला पाहिजे, हें उघड आहे बद्रीप्रसादला वांटणी करून मागण्याचा हक्क होता. परंतु त्यानें अमुकच वेळेला वांटणी करून मागितली पाहिजे, असें बंधन त्याच्यावर नव्हते. बद्रीप्रसादनें आपल्या ह्यातींत वांटणीचा दावा लावला असता तर त्याला जो हिस्सा मिळाला असता, तोच हिस्सा सारजूला मिळाला पाहिजे, असें म्हणण्यास कायद्याचा आधार नाहीं. हिस्सा निश्चित करवून घेण्याचा व त्या हिश्याचा ताबा मागण्याचा जो हक्क बद्रीप्रसादला होता तोच हक्क सारजूला प्राप्त झाला आहे. कुटुंबाची अविभक्तावस्था नष्ट झाल्याखेरीज कुटुंबांतील घटकांचे हिस्से निश्चित करतां येत नाहींत. सारजूनें १९४३ सालांत वांटणीचा दावा लावल्यामुळें कुटुंबाची अविभक्तावस्था १९४३ मध्यें नष्ट झाली असेंच म्हटलें पाहिजे व तसें झाल्यास गुरुदयाल, तुलसीराम व सारजु ह्यांना प्रत्येकीं $\frac{1}{3}$ हिस्सा मिळेल. १९४३ सालीं बद्रीप्रसादनें जर वांटणीचा दावा लावला असता तर त्याला ज्याअर्थी $\frac{1}{3}$ हिस्सा मिळाला असता त्या अर्थी सारजूलाही $\frac{1}{3}$ हिस्साच मिळाला पाहिजे, हें अगदीं उघड आहे.

वरील कारणास्तव आम्हीं हें अपील खर्चासह काढून टाकतों. व खालच्या कोर्टांनीं दिलेला निकाल कायम ठेवतों.

( १९४९ लॉ जर्नल पान ११९—गुरुदयाल वि. सारजू. )

# १६

# वशीकरण ताईत

" बे बे दोडिया, छत्रीना रिंग ! बे बे दोडिया, रिंगवाला, रबरवाला, इस्प्रिंगवाला ! "—

संध्याकाळीं मी फिरायला निघालों असतांना एक निर्वासित वरील शब्द उच्चारीत माझ्यापुढें येवून उभा राहिला. त्याच्या त्या स्प्रिंगच्या बारीक कड्या ओवलेल्या लोखंडी कड्यांतील एखादी रिंग घ्यावी कीं घेऊं नये असा मी विचार करीत असतांना, तो म्हणाला,

' लेव लेव साब । लई चांगला हाय, लेव । अस्सल माल हाय-फंटूीवाला बिलकूल नाय ! '

आपला माल खपविण्याची त्याची ती खटपट पाहून दोन पैसे टाकून मी एक रिंग घेतली. माझ्या मनांत विचार आला—

"या बिचाऱ्या लोकांनीं आपलें सर्वस्व गमाविलें आणि आतां येथें येऊन कितीतरी काबाडकष्ट करून हे निर्वासित लोक पोटापाण्याची व्यवस्था करीत आहेत, हा देखावा पाहिला, व या निर्वासित लोकांचे प्रयत्न पाहिले म्हणजे त्यांच्याबद्दल साहजिकच धन्योद्गार निघतात. याच्या उलट आपल्या देशांतील कांहीं लोक कांहीं प्रयत्न अथवा कष्ट न करतां भीक मागून अथवा लोकांना फसवून पैसे मिळवीत आहेत हा देखावा पाहिला म्हणजे मनाला कसेंसेंच वाटतें."

छत्रीला रिंग बसवून मी पुढें चाललों, तों वाटेंत.

"द द-द-द-दा-दा-रू—

म-मी-घेणार ! तूं—काय करणार ! "

असें म्हणून एक गृहस्थ ओरडत होता व त्याला दंडाला धरून तीन चार शिपाई घेऊन चालले होते.

त्या दारुड्याची हकिगत ऐकून मला फार वाईट वाटलें.

जेथें सैतान स्वत: जावूं शकत नाहीं, तेथें तो दारू पाठवितो, या म्हणीची सार्थकता ह्या दारुड्यांच्या हकिकतीवरून कोणालाही कळून आली असती. दारूच्या पायीं किती लोकांनीं आपला पैसा आणि शरीरसंपत्ती खराब करून टाकली असेल ! दुर्धर व घाणेरडे रोग जडवून घेतले असतील ! दुःखाची आग संसारावर फेकली असेल !

दारूबंदीच्या चळवळीच्या बुडाशीं एक महान् लौकीक स्वरूपाचें उद्दिष्ट आहे आणि तें म्हणजे साऱ्या समाजसंस्थेचा मूळ घटक असणाऱ्या कुटुंब-संस्थेचें संरक्षण हें होय. मुंबई सरकारनें जी दारूबंदीची चळवळ सुरूं केली आहे, त्यामुळें हें उद्दिष्ट जर सफल झालें तर किती आनंद होईल, अशा विचारांत मी पुढें चाललों तों एकदम मला कुणीतरी हांक मारली म्हणून मी वर पाहिलें. एकेकाळचा माझा मित्र प्रभाकर आपल्या बंगल्याचे गॅलरीमध्यें उभा होता, आणि तोच मला हांक मारीत होता. त्याच्याकडे जाण्याचें माझ्या मनांत नव्हतें. पण त्यानें फारच आग्रह केल्यावरून मी त्याच्या बंगल्यांत गेलों. माडीवर

गेल्यावर त्याच्या घरासमोरून कांहीं लोक मोठ्यानें गात चाललेले पाहिलें, ते म्हणत होते—

**"दारूचा दैत्य राक्षस। टाकण्या पाश। आला समयास।**
**हिन्दभूमीस बघे गिळण्यास।**
**सज्ज व्हा त्यास उभा जाळण्यास।**
**धिंगाणा त्याचा नष्ट करण्यास॥ ...जी॥"**

दारूबंदीचा पोवाडा ऐकून माझा मित्र प्रभाकर म्हणाला,

"सरकारनें दारूबंदी केली खरी पण ह्या दारूबंदी इतका महामूर्खपणाचा प्रकार दुसरा कोणताही नसेल!..."

दारूबंदीविरुद्ध माझा मित्राचें अगडबंब व्याख्यान सुरू असतांना मी त्याच्या माडींतील टांगलेल्या चित्राकडे व लावलेल्या पाट्यांकडे पहात होतों. त्या चित्रामध्यें तीन चार चित्रें **नग्न स्त्रियांचीं** होतीं. व कांहीं ठिकाणीं "आधुनिक मनाचे श्लोक" अशा नांवाखालीं कांहीं श्लोक लिहिलेले होते. त्यांपैकीं दोन असे होते.

**कधीं आगगाडींतूनीं हिंडतांना**
**चलच्चित्र वा नाटकें पाहतांना,**
**विचारी मना त्वां न खर्चीत जावें,**
**सदा श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरावें......**

* * * *

**कुणाचे विषीं अंतरीं होय तेढ,**
**निनांवी तया धाड रे 'नॉट पेड'**
**तयाचेनि नांवावरी लठ्ठ "व्ही. पी."**
**मना, मागवी त्याहुनी रीत सोपी......**

अशा तऱ्हेचे मनाचे श्लोक व तशा तऱ्हेचीं नग्न चित्रें पाहून, माझा मित्र कशा प्रकारचा आहे याची कोणालाही कल्पना आली असती. हल्लीं तो जो धंदा

करीत होता, त्यामुळें माझ्या मित्राचा मला विशेष राग येत असे. **दारूमुळें जें नुकसान होतें, त्यापेक्षां जास्त नुकसान प्रभाकर आपल्या धंद्यानें समाजाचें करीत आहे असें लोक म्हणत असत.** आपल्या धंद्यासाठीं फसवेगिरीच्या जाहिराती देणें योग्य नाहीं. असें मी म्हटल्यावर प्रभाकर एकदम रंगांत येवून म्हणाला—

"नटवेपणा नसेल तर तरुणी कसली? फसवेगिरी नसेल तर जाहिरात कसली?"

गेलीं तीन वर्षे प्रभाकरनें **वशीकरण ताईताचा** धंदा सुरू केला होता व त्यावर तो बराच गबर झाला होता. तीन वर्षांपूर्वी चारचार मैल देखील "वंदेमातरम्" करीत तो पायी चालत जात असे; पण आतां एक फर्लांग जाण्यासुद्धां त्याला रोल्सराईस गाडी लागत असे.

**"ह्या ताईताचा प्रभाव कांहीं और आहे. हा जवळ असला तर वाटेल ती गोष्ट विनासायास, विनाआयास साध्य होईल. ज्या स्त्रीवर तुमचें प्रेम आहे ती क्षणार्धात तुम्हांला वश होईल;— ह्या ताईताचा प्रभाव खोटा आहे असें कोणी सिद्ध केल्यास त्यास रोख शंभर रुपयांचे बक्षीस देण्यांत येईल..."**

असल्या त्याच्या जाहिराती कितीतरी वर्तमानपत्रांतून व मासिकांतून भल्या मोठ्या टाइपांत झळकत असत; व ह्याच जाहीरातीबद्दल तो आज रंगांत येऊन बोलत होता. त्याचें रंगीबेरंगी बोलणें ऐकून मी म्हटलें...

"सांबराला नाहीं का आपल्या फसव्या शिंगांबद्दल अभिमान वाटत? पण वेळ आली म्हणजे हींच शिंगें त्याला नाहीं कां गोत्यांत आणत? माझी खात्री आहे कीं, तुला देखील ह्याच जाहीरातीमुळें चांगलाच खो बसणार आहे—!"

"कां? इतकी वाईट इच्छा कां?" पोर्चमधील आपल्या मोटारीकडे पहात प्रभाकर म्हणाला.

"हें पहा, वाईट इच्छेचा प्रश्न नाहीं," वर टांगलेल्या भगिरथाच्या फोटोकडे पहात मी सांगूं लागलों-"**ह्या जगांत प्रयत्नाशिवाय अगर कष्टाशिवाय इच्छित गोष्ट साध्य होऊं शकत नाहीं. पुष्कळ लोकांना प्रयत्न अथवा कष्ट करण्याचा कंटाळा असतो त्यांची अशी खुळी समजूत असते कीं, एकदम वशीकरण ताईत, गंडा अगर दोरा मिळाला तर कांहीं प्रयत्न न करतां इच्छित गोष्ट साध्य होईल. खरंखरं तत्वज्ञान न कळल्यामुळें असले खुळे लोक तुझ्यासारख्याच्या जाहीरातींना बळी पडतात.**"

"तुझं तत्त्वज्ञान बंद कर" मला मध्येच थांबवीत प्रभाकर म्हणाला, "तत्वज्ञानाच्या हिंदोळ्यावर हेलकावे घेणारे तुझ्यासारखे लोक नेहमीं गरीबच राहाणार. व्यवहाराचा तराजू हातांत घेणारे माझ्यासारखे लोकच ह्या जगात श्रीमंत होतात!"

"पण व्यवहारी दृष्ट्या देखील तुझा हा धंदा तुझ्याच गळ्यांत येणारा आहे."

"तो कसा काय?"

"तुला एक झालेली गोष्ट सांगूं?"

"हो जरूर"

"पण एका अटीवर—"

"ती कोणती?"

"ती गोष्ट संपेपर्यंत तूं मध्यें बोलायचें नाहीं."

प्रभाकरनें ती अट कबूल केली व त्याला मी गोष्ट सांगू लागलों.

"पाटणा जिल्ह्यांतील कात्री-सराई ह्या गांवीं अखिल किशोरीराम ह्या नांवाचा एक गृहस्थ रहात असे. आपल्या नेहमींच्या नांवाखेरीज त्यानें निरनिराळीं तेरा टोपण नांवें धारण केलीं होतीं, व ह्या चौदा नांवांवर हिंदुस्तानांतील निरनिराळ्या वर्तमानपत्रांत भपकेबाज जाहीरात देऊन "**वशीकरण मंत्र**" विकण्याचा त्यानें धंदा सुरू केला होता. त्याच्या जाहीरातीचा नमुना असा असे—

## गुप्तमंत्र

### १०० रुपये बक्षीस

**लाखों रुपये खर्च करूनही जी गोष्ट मिळणार नाहीं, ती हा मंत्र सातदां म्हणण्यानें मिळूं शकेल, ह्या करितां कोणचेही श्रम वा आयास करण्याचें कारण नाहीं. कोणचेही प्रयत्न न करतांच तुम्हांला या मंत्राचा प्रभाव दिसेल. जिच्यावर तुमचें प्रेम आहे, ती फार कठोर व अत्यंत गर्विष्ठ असेल; पण तुम्हीं हा मंत्र म्हणाल तर तुमच्या सहवासांत सारखें रहाण्याची तिला उत्कंठा लागेल. ह्याला वशीकरण मंत्र म्हणतात. ह्याच्या योगानें तुम्हीं सुखी व्हाल, तुम्हांला नोकरी मिळेल, तुमची बढती होईल, कज्जा तुमच्यासारखा होईल; व व्यापारांत तुम्हांला नफा मिळेल. ह्या मंत्राचा प्रभाव खोटा आहे असें सिद्ध झाल्यास १०० रुपयांचें बक्षीस देण्यांत येईल. ह्या मंत्राची किंमत टपालखर्चासुद्धां दोन रुपये सात आणे.**

" सिद्धमंत्र आश्रम नं. ३७, कात्रीसराई, गया. "

इंग्लिश, बंगाली, उर्दू वगैरे हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषेंतून त्यानें जाहीराती दिल्या. केवळ जाहीरात देण्याकरितां त्यानें चार कारकून नेमले होते, ह्या एकाच गोष्टीवरून त्याच्या जाहीरातखात्याचा विस्तार कळून येईल.

ह्या जाहिरातींना व विशेषत: " **१०० रुपये बक्षीस देण्यांत येईल** ' ह्या अभिवचनाला बरेच लोक फसले. ह्याचा साहजिकच परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थानांतील कानाकोपऱ्यांतून अखिल किशोरीरामकडे मनिऑर्डरी येवूं लागल्या. व थोड्याच काळांत तो गब्बर झाला.

ज्या शिडीवरून मनुष्य वर चढतो त्याच शिडीवरून नाहीं कां तो खालीं येत ? जाहीरातीमुळें किशोरीराम श्रीमंत झाला खरा पण त्याच जाहीरातीमुळें तो

खालीं आला. ह्या जाहीरातीमुळें त्यानें लोकांना फसविलें अशाबद्दल त्याचेवर खटला सुरूं झाला.

खटल्यामध्यें जो पुरावा आला त्यामध्यें असें निष्पन्न झालें कीं, कमींत कमी पंचवीस हजार लोकांनीं तरी पैसे पाठवून वशीकरण मंत्राची मागणी केली होती. पाटणा हायकोर्टाचे न्यायमूर्ति सैलंड ह्यांनीं आपल्या ठरावांत म्हटलें—

...... हा सर्व प्रकार म्हणजे डोकेबाज लबाडीचा नमुना आहे. आरोपी किशोरीराम तर्फे असें सांगण्यांत आलें कीं, पौर्वात्य देशांत विशेषतः हिंदुस्थानांत आणि हिन्दु लोकांमध्यें मंत्रावर पुष्कळ लोकाचा विश्वास असल्यामुळें अखिल किशोरीरामाचें कृत्य गुन्हा या सदरांत पडत नाहीं... ह्या जगांत दोन प्रकारचे लोक असतात. **नाटककार शेक्सपीअर ह्यानें म्हटल्याप्रमाणें पहिल्या प्रकारच्या लोकांची मनःप्रवृत्ति अशी असते कीं इच्छित गोष्ट मिळवण्याकरितां वाटेल तितका प्रयत्न करण्यास ते मागें पुढें पहात नाहींत. जरी त्यांना इच्छित गोष्ट मिळाली नाहीं तरी आपण आपल्याकडून प्रयत्न केला ह्यांतच त्यांना समाधान वाटतें. दुसऱ्या प्रकारच्या लोकांची मनःप्रवृत्ति अशी असते कीं, त्यांना इच्छित गोष्टी मिळविण्याकरितां प्रयत्न करावेसे वाटत नाहींत. कांहींतरी जादू अगर मन्त्र ह्यानें अनायासें इच्छित गोष्टी साध्य व्हाव्या असें वाटत असतें......**

पहिल्या प्रकारचे लोक असल्या जाहिरातींना बळी पडत नाहींत; पण दुसऱ्या प्रकारचे लोक असल्या जाहिरातीमुळें सहज फसतात... ह्या कज्जांत आरोपी किशोरीरामतर्फे कितीही सुंदर तक्रारी करण्यांत आल्या असल्या तरी माझी अशी खात्री झालेली आहे कीं, किशोरीरामनें दुसऱ्या प्रकारच्या लोकांना फसविलें आहे व स्वतःचा फायदा करून घेतला आहे.

झालेल्या पुराव्यावरून कोर्टाची खात्री झाली कीं, कांहींही प्रयत्न न करतां केवळ मंत्राच्या प्रभावानें इच्छित गोष्टी मिळूं शकतील असें समजणाऱ्या भोळ्या

लोकांना किशोरीरामानें पुरेपूर फसविलें आहे, व आपला खिसा चांगला गरम केला आहे. इंडियन पीनल कोड कलम ४१५ प्रमाणें शाबीत होणाऱ्या अपराधाबद्दल खालच्या कोर्टानें अखिल किशोरीरामला ११ महिने सक्त मजुरी व तीन हजार रुपये दंड केला. ही शिक्षा कायम करतांना पाटणा हायकोर्टानें म्हटलें, "आणखी किती लोकाना ह्या मंत्रविक्यानें फसविलें आहे कोणास ठाऊक! जो पुरावा पुढें आला आहे त्यावरून पहातां झालेली शिक्षा कांहीं खास जास्त नाहीं......"
(अखिल किशोरीराम वि. सरकार, १७४ अिंडियन केसीस, पान ६३५)



कपोलकल्पित कल्पनेच्या जोरावर लिहिलेल्या कथाकादंबऱ्यांतील सांगोवांगीची ही गोष्ट नसून कायद्याच्या कोर्टांत कांहीं दिवसापूर्वी प्रत्यक्ष घडलेली ही सत्यकथा आहे, असें पाहून प्रभाकर एकदम गंभीर झाला. त्याला काय वाटलें कोणाला ठाऊक! पण मी परत निघालों असतां तो म्हणाला—

"माझ्यासारख्या धंदेवाईक लोकांनीं व माझ्यासारख्या जाहीरातीवर विश्वास ठेवणाऱ्या भोळ्याभाबड्या लोकांनीं ह्या गोष्टीपासून बराच बोध घेण्यासारखा आहे.

---

# १७

# स्वरूपसुंदर सुरेखा

" अहोऽकिर्लोस्कर वकीऽऽल "

" अहोऽझारापकर वकीऽल "

कोर्टाच्या जमादारानें तीनदा पुकारलें. कोर्टात जमलेल्या चिकार गर्दीतून बाट काढीत दोन वकील आत आले. त्याच्यामागून कायद्याची लठ्ठ पुस्तकें आंत आणण्यांत आली.

जोरजोरानें तक्रारी सुरूं झाल्या. बघे लोक मनांत म्हणत होते, ' बहोत मजा आहे बुवा ! '

तक्रारी सुरूं असतांनाच एक गृहस्थ जवळच्या गृहस्थास म्हणाले,

" मी बरेच दिवस या कोर्टात येत आहें; पण असला मजेशीर कज्जा पाहिला नव्हता ! --बराच उष्मा झाल्यावर एकदम पाऊस पडला तर नाहीं का मजा वाटत ? असलीच मजा ह्या कज्जानें निर्माण केली आहे. "

इतक्यांत न्यायाधीश व वकील ह्यांची एका मुद्याबाबत वादावादी झाली. ती एकून शेजारच्या गृहस्थ पहिल्या गृहस्थास म्हणाला,

"ह्या वादावादीमुळें जास्तच मजा वाटते. बराच उष्मा झाल्यावर पाऊस पडला तर मजा वाटते; पण गारांचा पाऊस पडला तर जास्त मजा नाहीं का वाटत ? तशांतलाच हा प्रकार आहे."

हा कज्जा ऐकण्यास एका बाजूला रमण आणि दुसऱ्या बाजूला रवींद्र आणि सुरेखा बसली होती. बऱ्याच लोकांचे लक्ष तिघांच्या चेहऱ्यांकडे व त्यांच्या चेहऱ्यावर उमटणाऱ्या भावनांकडे होतें. एखादें मनोहर दृश्य प्रत्यक्ष पहाण्यापेक्षां त्या दृश्याचें पडलेलें प्रतिबिंब पहाण्यांत काहीं कांहीं लोक जास्त आनंद मानतात. अशाच कांहींशा भावनेनें कोर्टांत चाललेल्या प्रकारांचें प्रतिबिंब पाहण्याकरितां कांहीं बघे लोक ह्या तीन चेहऱ्यांचा उपयोग आरशाप्रमाणें करीत होते.

झालेला प्रकार व त्यांतून उत्पन्न झालेला कज्जा त्याची थोडक्यांत हकीकत अशी होती--

रमण हा बोरेगांवचा राहाणारा, एका श्रीमंत बापाचा एकुलता एक मुलगा सहा आंकड्याची श्रीमंती, दिसायला सुंदर, इंटरपर्यंत शिक्षण, घरचें बघण्याचा व्यवसाय--अशी परिस्थिती असतांना रमणचें लग्न होणें कठीण नव्हतें. पण बोरेगांवांत अगर आसपासच्या गांवांत कोणीही मनुष्य त्याला आपली मुलगी देण्यास तयार नव्हता !

शेवटीं बोरेगांवापासून दोनशें मैल लांब असलेल्या मुळगांवच्या एका गरीब माणसाने आपली रूपसुंदर सुरेखा हिचें लग्न त्याच्याशीं ठरविलें.

जरूर नसलेल्या विधींना फाटा देण्यांत येऊन नवीन पद्धतिप्रमाणे आवश्यक विधि करून लग्न करावयाचें असें ठरलें, नि झालें.

सतरा वर्षांची बिचारी सुरेखा मात्र या सर्व कार्यक्रमांत सारखी रडत होती कारण ?

कारण तिचा नवरा रमण, सुंदर व श्रीमंत असला तरी वेडपट होता.

आपल्या वेडेपणाचा प्रभाव त्यानें बोहल्यावर पुरेपूर दाखविला !

आपला जांवई वेडपट आहे हें पाहून सुरेखाचा बाप ओक्साबोक्सीं रडूं

लागला. सुरेखाची आई व इतर बायका ह्यांनीं जोरानें साथ सुरू केली. लग्नाच्या शुभ मंगलदिनीं मुलीकडच्या वऱ्हाड मंडळींत सुतकी वातावरण पसरलें.

एका शहाण्या पोक्त माणसानें सुरेखाच्या बापाला सल्ला दिला.

" आज रात्रीं वरातीच्या आधींच आपण सर्वजण येथून निघून मुळगांवला परत जाऊं व तेथें जाहीर करूं कीं, सुरेखाचें लग्न मोडलें! लवकरच एखादें बरें स्थळ पाहून आपण सुरेखाचें लग्न करूं म्हणजे झालें! "

हा बेत सर्वत्रांस पसंत पडला व त्याचप्रमाणें तो अमलांतही आला.

पुढच्या मुहूर्तावर सुरेखाचें लग्न रवींद्राबरोबर झालें. रवींद्र घरचा गरीब परंतु हुषार होता, देखणा होता, बी. ए. होता. विश्वविद्यालयीन यशामुळें त्याला सरकारी नोकरी होती.

लक्षाधीश पण वेड्या रमणला सोडून पोटापुरतें मिळविणाऱ्या गरीब रविंद्राशीं विवाहबद्ध झाल्यावर सुरेखाचा आनंद गगनांत मावेना. तिनें आपल्या डायरींत लिहिलें,

" कला व जीवन ह्याबद्दल लोक अटीतटीचे वादविवाद करतात, पण खरा वाद श्रीमंती व गरिबी ह्यांत आहे. ह्या वादविवादातील उपमा लक्षांत घेऊन आपणांस असें म्हणतां येईल—

गरिबी म्हणजे जमीन! काळी, उंचसखल, ओबडधोबड पण तिच्यांतून पिकें निघतात.

श्रीमंती ही आकाशासारखी! आकाशावर नक्षत्रें चमकलीं तरी फळें जमिनीवर पिकतात.

श्रीमंत लोक म्हणतील—' पण हीं फळें पिकवितो कोण? आकाशानें पाऊस पाडला नाहीं तर? '

यावर गरीब लोकांचें उत्तर असें—' पण आकाशांत पाऊस कोठून जातो? जमिनीवरूनच ना? '

× × ×

सुरेखा व नरेंद्र ह्यांचा विवाह झाला तेव्हां रवींद्राला सुरेखाच्या पूर्वीच्या लग्नाची हकीकत माहीत नव्हती. पुढें ती हकीकत कळल्यावर तो चेष्टेनें आपल्या पत्नीला म्हणाला,

आजपर्यंत एक पत्नि जिवंत असतांना कांहीं पुरुष तेव्हढें दुसरें लग्न करत असत; पण आतां एक नवरा जिवंत असतांना बायकासुद्धां दुसरें लग्न करूं लागल्या आहेत.

× × ×

लग्नांत रमण बराच वेडपट होता. पण पुढें कांहीं दिवसांनीं त्याचें वेडेपण कमी होऊन तो बराच सुधारला. त्यानें आपल्या बापाच्या सल्ल्यानें असा दावा लावला कीं—

आपले व सुरेखाचें झालेलें लग्न कायदेशीर आहे. सुरेखाचें नि रवींद्राचें लग्न बेकायदेशीर व रद्द ठरवून आपणाला सुरेखाचा ताबा मिळावा.

सर्व लोकांच्या कौतुकाचा व चर्चेचा विषय झालेला तो कज्जा सुरूं झाला. उभय पक्षातर्फे बराच पुरावा झाला शेवटीं वकिलांच्या तक्रारी सुरूं झाल्या.

वादी रमण ह्याच्या वकिलांनीं तक्रारींत कायद्याच्या मुद्याबाबत सांगतलें,—

" ह्या कज्जांत मुख्य प्रश्न एवढाच आहे कीं, वेड्या माणसाबरोबर झालेला विवाह हिंदु कायद्याप्रमाण कायदेशीर आहे कीं नाहीं ? मौनीलाल वि. चंद्रावती ( ३८ आयू. ए. एफ् पान १२२ ) प्रीव्ही कौन्सिलच्या ह्या कज्जांत, नवरा वेडा आहे ह्या मुद्यावर लग्न बेकायदेशीर आहे, अशी तक्रार घेण्यांत आली होती. नवरा पूर्ण वेडा नाहीं असा शेरा मारून प्रीव्ही कौन्सिलनें तें लग्न कायदेशीर तेवढ्या कारणावरून झालेला विवाह रद्द अथवा बेकायदेशीर आहे असें म्हणतां येणार नाहीं सर गुरुदास बानर्जीच्या मताप्रमाणें हिंदु कायद्यांत वेड्या लोकांना लग्नाचा अधिकार आहे; त्यामुळें वेड्या माणसांचीं लग्नें पूर्ण कायदेशीर आहेत. ट्रेव्हलीनच्या मताप्रमाणें नवरा अगर नवरी वेडी असेल तर तेवढ्याच कारणाकरितां हिंदू विवाह रद्द होत नाहीं.

यावरून हें उघड आहे कीं, रमण व सुरेखा ह्यांचा विवाह कायदेशीर आहे. एक नवरा जिवंत असतांना हिंदु स्त्रीला दुसरा नवरा करतां येत नाहीं; हे तत्व

माझ्या विद्वान मित्रांना मान्य असेल यात शंका नाहीं. सबब रवींद्राचा व सुरेखाचा विवाह बेकायदेशीर व रद्द आहे.

विरुद्ध बाजूच्या वकिलांनीं आपल्या तक्रारींत वरील विवेचनाला उत्तर दिलें;

"हिंदु विवाहांत कन्यादान व त्या दानाचा नवऱ्यानें स्वीकार करणें हे मुख्य विधी आहेत. वेड्या नवऱ्याला भार्येचा स्वीकार करणें कायदेशीरपणें शक्य नसल्यामुळें रमणबरोबर सुरेखाचा झालेला विवाह हा विवाहच होत नाहीं. ( हिंदू लॉ ऑफ मेरेज ॲण्ड स्त्रीधन, पान ४०–४१ ) त्यांत वेड्या नवऱ्याबरोबर झालेला विवाह कायदेशीर होईल का, याबद्दल शंका घेतली आहे. "मुल्लाज हिंदु लॉ" त्यांत वेड्या माणसाचे लग्न कायदेशीर नसावें असा अभिप्राय दिला आहे.

ह्या कज्यात आपण विशेषतः सुरेखाच्या हिताच्या दृष्टीनें विचार करावा. ती आज रवींद्राबरोबर सुखांत आहे. तिच्या डायरीचा उतारा त्या कज्यांत हजर झालेला आहे. यावरून दोन लग्नातला फरक कोर्टास कळून येईल; सबब सुरेखाचें पहिलें लग्न बेकायदेशीर व दुसरें लग्न कायदेशीर आहे असें आपण ठरवावें अशी आपणास माझी विनंति आहे."

तक्रारी झाल्यानंतर न्यायाधीशाच्या मनांत विचार आला—

'रमण लग्नांत पूर्णपणें वेडा नव्हता, वेडपट होता. त्याच्या लग्नाच्या वळीं जरूर तेवढे लग्नविधी झाले होते. अशा परिस्थितींत हिंदू कायद्यांतील सर्व आधारांचा विचार करतां, असें लग्न हिंदू कायद्याला अभिप्रेत आहे दिसतें. कारण, हिंदु विवाह हा करार नसून संस्कार आहे. पण—

'एका वेडपटाबरोबर झालेले लग्न कायदेशीर ठरविणें हें चमत्कारिक नाहीं काय ? वादीच्या बाजूनें निकाल दिला तर बिचाऱ्या सुरेखाच्या सुखांत कांटे पेरल्याप्रमाणें नाहीं का होणार ? हिंदु स्त्रियांची स्थिती असावी तितकी चांगली नाहीं. अशा परिस्थितींत शक्य असेल तर न्यायाधीशानी त्यांच्या हिताच्या दृष्टीनें हिंदु कायद्याचा अर्थ लावणें श्रेयस्कर नाहीं काय ? थोडीशी स्वतंत्र बुद्धी चालवून मी ह्या कज्याचा रमणच्या विरुद्ध निकाल दिला तर काय होईल ? पण—

'रमणच्या बाजूला असलेल्या आधारांची काय वाट लावावयाची? कायद्याची व व्यवहाराची निरगांठ सोडवत बसण्यापेक्षां न्यायाधीशांना वाटलें. आपण निराळाच उपाय करून पाहूं. त्यांनीं बोलण्यास सुरवात केली--

'कोणताही कज्जा आपसांत करा असें आजपर्यंत मी कोणास सांगितलें नाहीं. पण ह्या कज्यांतील विशिष्ट परिस्थिती पहातां मला वाटतें, पक्षकारांनीं हा कज्जा आपसांत केलेला बरा.

वादीच्या बाजूच्या लोकांनी असा विचार करावा कीं,--

हिंदु कायद्याप्रमाणें पाहतां वेडसर माणसाबरोबर झालेला विवाह कायदेशीर होतो असें जरी गृहीत धरलें, तरी पुराव्यांत आलेल्या बाकीच्या गोष्टींचाही या कज्जांत विचार करावा लागेल. एखादे लग्न कपटानें झालेलें असेल तर तें हिंदु-कायद्याप्रमाणें बेकायदशीर आहे. रमणचे वडील नानासाहेब ह्यांनी आपला मुलगा वेडसर आहे ही गोष्ट मुलीपासून व तिच्या वडीला पासून मुद्दाम लपवून ठेवून बोरेगावपासून दोनशें मैलांवर असलेल्या एका गरीब माणसाच्या मुलीला फसविलें असें जर ठरलें, तर त्याचा परिणाम काय होईल?

उलट प्रतिवादी तर्फेच्या लोकांनी असा विचार करावा कीं,--रमण बरोबरचे लग्न कायदेशीर ठरले तर सुरेखाचे लग्न पुन्हां रवींद्राबरोबर करण्यांत फौजदारी गुन्हा होत नाहीं काय?

तेव्हां दोन्ही बाजूंनी असा विचार करावा कीं,—

कांहीं दिवस मोठ्या आनंदाने रवींद्राबरोबर संसार केल्यानंतर सुरेखाला रमणच्या घरीं जा म्हणून सांगणें हें कोणाही विचारवंत माणसाला पटणार नाहीं. ही गोष्ट कायद्याला धरून असली तरी व्यवहाराला सोडून आहे. गणितांत नाहीं का एखाद्याप्रश्नाचें उत्तर साडेतीन पुरुष व साडेसात बायका असे येत? पण व्यवहारांत ही गोष्ट कितपत जुळणारी आहे? असलाच प्रकार कायदा आणि व्यवहार ह्या बाबतींत आहे.

'अशी एक म्हण आहे कीं, कायदा कितीहि वाईट असला, तरी न्यायाधीश जर चांगला असेल तर लोकांना चांगलाच न्याय मिळेल. हिंदु कायद्याप्रमाणें वेडसर

माणसाशीं झालेला विवाह कायदेशीर ठरतो ही आजची परिस्थिती कुणीही विचारी माणसाला पटण्यासारखीं नाहीं. हा हिंदुकायद्यातील दोष शक्य तितक्या लवकर दूर झाला पाहिजे त्यांत वाद नाहीं. पण तोपर्यंत वरील म्हणीचा उपयोग करणें शक्य असेल तर तसें करणे श्रेयस्कर नाहीं काय ?

' मला वाटतं, रमणाच्या लग्नानंतर वरातीच्या पूर्वीच मुलीकडील मंडळी चिडून निघून गेली; त्यामुळें चिडून जाऊन हा दावा दाखल झाला असावा. आपल्या अपमानाचें उट्टे काढण्यासाठींच रमण व त्याचे वडील ह्यांनीं हा दावा लावला असल्याचा संभव आहे. अशा परिस्थितींत सुरेखा व तिचे वडील ह्यांनी रमण व त्याचे वडील ह्यांची मनःपूर्वक माफी मागितली व कोर्ट खर्चाबद्दल उभय पक्षकारांनीं कांहीं देवाण घेवाण केली तर हा दावा आपसांत मिटणे शक्य आहे. रमणचें वेडेपण आतां कमी झालें आहे, तेव्हां त्यालाही एखादी चांगली मुलगी मिळूं शकेल......

मी पंधरा दिवस मुदत देतों; तों पर्यंत आपसांत मिटलें तर पहा. नाहींतर पुढें माझा निकाल मी जाहीर करीन,

## पंधरा दिवसानंतर

एके दिवशीं रमणच्या आग्रहामुळें सुरेखा व रवींद्र त्याच्या घरीं गेलीं. आठ दिवसांपूर्वींच विवाहबद्ध झालेली रमणची पत्नी रेणुका घरांत होती.

तिनें सुरेखास पाहून म्हटलें, " वहिनी ! आंत या ना ! "

# १८

# स्थानिक स्वराज्य अर्थात् म्युनिसिपालिटी

" स्थानिक स्वराज्य अर्थात म्युनिसिपालिटी " हें नाटक झाल्यापासून विनोदी साहित्यिकांच्या चष्म्यांतून स्थानिक स्वराज्याचा कारभार कसा चालतो याचें दिग्दर्शन झालें. न्यायमूर्तींच्या चष्म्यांतून स्थानिक स्वराज्याचा कारभार कसा चालतो हें पाहणें मोठें मनोरंजक होईल. कांहीं दिवसापूर्वी मद्रास हायकोर्टाचे न्यायमूर्ति वर्डस्वर्थ ह्यांनीं एका कज्जाची हकिकत सांगितली. ती पाहिली असतां आपला कार्यभाग होईल.

**ती हकिकत थोडक्यांत अशी....**

**वादी वकील**—सन्मान्य न्यायाधीशसाहेब, प्रतिवादी अय्यर यांनीं वादी नगरसभेला ( म्युनिसिपालिटीला ) ठराविक कर दिला नाहीं, म्हणून नगरसभेनें १९ रुपये १५ आणे ११ पै वसूल होऊन मिळणेबद्दल प्रतिवादीवर हा दावा केला आहे. या रकमेबद्दल नगरसभेनें मागणी केली होती, पण रक्कम दिली नाहीं, ही गोष्ट प्रतिवादीस कबूल आहे, सबब पुराव्याचा बोजा कायद्यानें प्रतिवादीवर पडत आहे.

**न्यायाधीश**—कबूल. ( प्रतिवादी-वकिलाकडे वळून ) आपण सुरू कराल काय ?

**प्रतिवादी वकील**—जशी आपली मर्जी—या कराबद्दल नगरसभेनें माझ्या पक्षकाराकडे मागणी केली व माझ्या पक्षकारानें हा कर दिला नाहीं, ही गोष्ट मला कबूल आहे, पण वादीला असला कर घेण्याचा अधिकार आहे का, याबद्दलच माझी तक्रार आहे. थोडक्यांत माझ्या पक्षकाराचें म्हणणें असें आहे—

या नगरसभेला कर घेण्याचाच अधिकार नाहीं, कारण कायद्यानें ज्याला नगरसभा म्हणतां येईल, तशी ही नगरसभा नाहीं. खरी नगरसभा म्हणजे शहरांतील नागरिकांचें हित पाहणारी संस्था असते, पण आमची ही नगरसभा म्हणजे लांच, पैसा खाणें, वाटेल तसला धागडधिंगा घालणे, असल्या गोष्टींचें माहेरघर आहे. गांवांतील निरनिराळ्या पक्षोपक्षांची ती युद्धभूमि आहे. नागरिकांचें अहित कसें करणें, हें ठरविणारी ती एक कुटाळकंपू लोकांची संस्था आहे. एवंगुणविशिष्ट संस्थेला कर देणें, हें कायद्याला, न्यायाला वा नीतिला धरून नाहीं, कारण अशा संस्थेला कर देणें म्हणजे स्वतःचाच घात करून घेण्यासारखें आहे. माझ्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ मी माझा पुरावा बोलावतों.

प्रतिवादी अय्यर साक्षीच्या पिंजऱ्यांत आल्यावर त्याची साक्ष सुरू झाली.

**प्रतिवादी वकील**—नगरसभेनें तुमच्याकडून कर मागितला व तो तुम्हीं दिला नाही, ही गोष्ट तुम्हांला कबूल आहे ?

**अय्यर**—होय. कबूल आहे, पण—

**प्रतिवादी वकील**—विचारलेल्या प्रश्नांचेंच तेवढें उत्तर द्यायचें, जास्त बोलायचें नाहीं बरं का ! या नगरसभेला कर मागण्याचा अधिकार नाहीं, असें तुम्हांला म्हणायचें आहे. असें तुम्हीं कां म्हणतां बरें ?

**अय्यर**—नागरिकांचें आरोग्य, त्यांच्या सुखसोयी व शिक्षण यांबद्दल तरतूद करणें, हें नगरसभेचें कार्य आहे. पण आमची नगरसभा यांपैकीं कांहीं एक न करतां रोग, भांडणें व धुरळा फैलावण्याचेंच तेवढें काम करते. म्युनिसिपल सभासदांकडून अगर त्याच्या नातलगांकडून कर वसूल करण्यांत येत नाहीं, व जो

पैसा वसूल करण्यांत येतो, त्याची वाटेल तशी उधळपट्टी करण्यांत येते. मतदारांच्या खोट्या याद्या प्रसिद्ध करण्यांत येतात व भरपूर लांचलुचपत देऊन मतें मागण्यांत येतात, जेव्हां म्युनिसिपल सभा भरते, तेव्हां हाणामारी, तोंडातोंडी, धागडधिंगा, बेछुट ठराव, वॉक आउट, याशिवाय दुसरें कांहींच होत नाहीं. हेंच आमचें 'स्थानिक स्वराज्य' असल्या नगरसभेला कर मागण्याचा अधिकार नाहीं, असें माझें म्हणणें आहे.

प्रतिवादीचा सरतपास संपला व उलटतपास सुरू झाला.

**प्रतिवादी वकील**—मिस्टर अय्यर ! तुम्हीं म्युनिसिपल निवडणुकीला उभे राहिला होतां, पण त्यांत पडलां हें खरें आहे काय ?

**अय्यर**—होय ! मला सांगावयाला लाज वाटतें कीं, मी निवडणुकीला उभा राहिलों होतों; पण मला सांगावयाला आनंद वाटतो कीं, मी निवडणुकींत पडलों.

**प्रतिवादी वकील**—तुम्हीं निवडणुकींत पडला म्हणूनच तुम्हीं म्युनिसिपल सभासदांना नांवें ठेवतां हें खरें ना ?

**अय्यर**—नाहीं ! खोटें आहे ! त्या म्युनिसिपल सभासदांशीं मला काय करावयाचें आहे ? ते कांही सभासद नाहींत—पाजी, हरामखोर लोक आहेत.

कोर्टांत असें न बोलण्याबद्दल न्यायाधीशसाहेबांनी प्रतिवादी अय्यर यांस बजावलें. बाकीच्या उलटतपासांत अय्यरनें सांगितलें—

"माझा एक पुतण्या आहे; त्यानें पाठविलेलें दिव्यांचें टेंडर नगरसभेनें स्वीकारलें नाहीं, हें मला माहीत नाहीं. माझ्या पुतण्यानें नोकरीकरितां अर्ज केला होता; पण त्याला नगरसभेंत नोकरी मिळाली नाहीं. ही गोष्ट खरी नाहीं."

**प्रतिवादी वकील**—मिस्टर अय्यर ! तुमच्याजवळ पैसे नाहींत, म्हणून तुम्हीं कर देत नाहीं. हें खरें आहे काय ?

**अय्यर**—साफ खोटें ! तुमच्या पक्षकाराप्रमाणें मी कांहीं भिकारी नाहीं. प्रतिवादीचा उलटतपास संपला.

नंतर प्रतिवादीतर्फे वर्तमानपत्रवाल्याची साक्ष झाली. त्यानें आपल्या सरतपासांत सांगितलें, मी 'येगियो गॅझेट'चा संपादक आहे. ता. ६ जानेवारीच्या

नगरसभेला मी गेलों होतों. सभा सुरू झाल्याबरोबर एकानें पॉईंट ऑफ आर्डर उपस्थित केली. त्याबरोबर दोन तास नुसता बेबंदशाहीं कारभार सुरू झाला. दोन तासानंतर आपल्या रक्तबंबाळ नाकानिशीं दोन सभासद घराकडे निघून गेले. आणि कांहींएक ठराव न होतां सभा संपुष्टांत आली.

मी ८ फेब्रुअरीच्या नगरसभेला गेलों होतों. जनरल फ्रॅंकोच्या सैन्यामध्यें इटालिय सैनिकांनीं धोब्यांच्या गाढवांना वाईट रितीनें वागविलें, त्याबद्दल एक ठराव चर्चेस निघाला. फक्त धोब्यांच्या गाढवापुरताच ठराव मर्यादित करावा कीं सर्व गाढवांचा समावेश ठरावांत करावा, या मुद्यावरच तब्बल तीन तास चर्चा झाली. शेवटीं सर्व गाढवांचा समावेश करणें हे नगरसभेच्या कर्तव्याच्या दृष्टीनें योग्य आहे, असें बहुमतानें ठरलें आणि त्याप्रमाणें ठरावांत दुरुस्ती करण्यांत आली. त्यादिवशी नेमलेल्या बाकीच्या कामाकरितां वेळ न राहिल्यामुळें त्या दिवसापुरती सभा तहकूब झाली. यानंतर ता. १४ मार्चच्या सभेला मी गेलों होतों. ती सभा ठरल्या वेळेपेक्षां एक तासानें उशिरा सुरू झाली. कर्वाकरण गल्ली दुरूस्ती करणे बद्दल दोनशे रुपये मंजूर व्हावे अशाबद्दल प्रथम ठराव चर्चेस निघाला. या गल्लीमध्यें अध्यक्षांचें घर होतें. विरूद्ध बाजूकडील एका सभासदानें या रकमेबद्दल आक्षेप घेतला कीं, ज्याअर्थीं सेंट्रल जेलमधील कैद्यांना अद्याप ग्रामोफोन देण्याची व्यवस्था झाली नाहीं, त्याअर्थीं ही रक्कम मंजूर करूं नये. हा आक्षेप गैरलागू आहे असा अध्यक्षांनीं निर्णय दिल्यावर विरूद्ध बाजूचे लोक सभागृहांतून निघून गेले. व मग पुरेसा कोरम नसल्यामुळें सभा तहकूब झाली.

उलटतपासांत त्यानें सांगिलें.—

“ आमच्या पत्राला पूर्वीं नगरसभेकडून जाहिराती मिळत असत; पण हल्लीं मिळत नाहींत. माझा एक मेहुणा डॉक्टर आहे. तो पूर्वी नगरसभेंत नोकर होता. त्याला कामावरून कमी केले आहे. मी पूर्वीं मुंबईंत वर्तमान पत्राचा धंदा करीत होतों. तेथें म्युनिसिपल निवडणुकींत लांच दिल्याबद्दल माझ्यावर खटला होणार होता म्हणून मी मुंबई सोडली, हें खरें नाहीं. ”

येथें प्रतिवादीचा पुरावा संपला.

वादीतर्फे पुरावा सुरू झाला.

**वादी वकील**—न्यायाधिशसाहेब ! प्रतिवादीतर्फे असें कबूल करण्यांत आलें आहे, कीं कायद्याप्रमाणें प्रतिवादीनें हा कर अद्याप दिला नाहीं. प्रतिवादीची एवढीच तक्रार दिसते कीं म्युसिपालटीला हा कर घ्यावयास अधिकार नाहीं. माझें असें म्हणणें आहे कीं, प्रतिवादीतर्फे नगरसभेविरुद्ध करण्यांत आलेलीं विधानें धादांत खोटीं व नितांत बेअबीकारक आहेत. आमच्यातर्फे मी पहिल्यांदा नगरसभा चेअरमनची साक्ष घेतों.

चेअरमन साहेबांनीं शपथ घेतली व आपल्या सरतपासांत सांगितलें—

“ गेलीं तीन वर्षें मी या नगरसभेचा चेअरमन आहे. या कालांत म्युनिसिपालटीनें एकंदर ५९७ ठराव पास केले; पंधरा मैल साडेसात फर्लांग रस्ते दुरुस्त केले आणि कराच्या रुपानें दीड लाख रुपये लोकांच्या कडून गोळा केले. प्रतिवादीतर्फे नगरसभेविरुद्ध करण्यांत आलेलीं सर्व बिधानें बिलकुल असत्य आहेत. ”

त्यांनीं उलटतपासांत सांगितलें—

“ अद्याप लोकाकडून किती पैसें वसूल करावयाचे आहेत, हें मला सांगतां येत नाहीं. गेल्या तीन वर्षांत म्हणजे मी चेअरमन असल्यावेळीं माझ्याकडे कोणत्याही कराबद्दल नगरसभेकडून कधीं तरीं मागणी करण्यांत आली आहे का, हें मला आठवत नाहीं, पण मी एवढे सांगतों कीं, जेव्हां मागणी करण्यांत आली असेल, तेव्हां मी पैसे दिले आहेत. नगरसभेच्या बाकीच्या सभासदांकडून आतांपर्यंत कोणताही कर वसूल केला नाहीं, ही गोष्ट खोटी आहे. म्युनिसिपालिटीच्या सभा सुरू असतांना आतांपर्यंत कधींही पोलिसांची मदत मागण्यांत आली नाहीं. पुन्हा सांगतों कीं, सभासदांनीं द्वंद्वयुद्ध सुरू केल्यामुळें दोन खेपेस मी स्वतः पोलिसांची मदत मागितली असेल, पण त्याबद्दल मला नक्की आठवत नाहीं. जे पंधरा मैल रस्ते दुरुस्त करण्यांत आले आहेत, त्यामध्यें ज्या कचीकरण गल्लीमधें मी राहतो, त्या गल्लीचा समावेश होतो. कचीकरण गल्लीची दुरुस्ती

चांगली झाली आहे. ज्या ठीकाणीं गरीब लोक रहातात त्या ठिकाणच्या रस्त्यावर होणारा दुरुस्तीचा सर्व खर्च मक्तेदार, मिस्त्री व नगरसभा-सभासद यांच्या खिशांत जातो, ही गोष्ट खोटी आहे. माझ्या अमदानींत गांवांतील मरणसंख्या वाढली असेल, पण त्याबद्दल मला दोष देण्याच्या ऐवजीं देवाला दोष दिला पाहिजे. माझ्या अमदानींत गटार, नाले, वगैरे तुडुंब भरलेले आहेत, त्यांना वहाण्याला मार्ग नाहीं, हें म्हणणें खरें नाहीं. ''

यानंतर नगरसभेतर्फे बक्षीसाहेबांची साक्ष झाली. त्यांनीं आपल्या सरतपासांत सांगितलें—

" मी आमच्या नगरसभेचा ओव्हरसिअर आहे. गांवांतील गटारें, नाले तुडुंब भरले आहेत ही गोष्ट खोटी आहे. त्याप्रमाणें गरीब लोकांच्या वस्तीमधील होणारा खर्च मक्तेदार मिस्त्री व म्युनिसिपल सभासद यांच्या खिशांत जातो ही गोष्ट खोटी आहे. ''

त्यानीं उलटतपासांत सांगितलें—

" या पैशापैकीं बराच पैसा माझ्या खिशांत जातो हें म्हणणें खरें नाहीं. मी गरीब मनुष्य आहे; पण प्रामाणिक आहे. मला लोक " बक्षीस साहेब " म्हणतात हें खरें आहे. मला बक्षीस दिल्याशिवाय नगरसभेंतील कोणतेंच काम होत नाहीं. म्हणून मला बक्षीससाहेब म्हणतात, हें खरें नाहीं. गेल्या वर्षी मी स्वतः नवें घर बांधलें नाहीं, पण माझ्या बायकोनें बाधलें. तें घर चेतुमसाहेब नांवाच्या नगरसभा मक्तेदारानें बाधले असेल. त्या घराकरिता एकदर ७०००० रुपये खर्च झाले असतील, पण त्याबद्दल मला माहीत नाहीं, कारण ते माझें घर नसून माझ्या बायकोचें आहे. मला पगार सत्तेचाळीस रुपये आठ आणे आहे. माझी बायको श्रीमंत नाहीं; तिनें आपले दागिने गहाण टाकून कर्ज काढलें आहे. तिनें पनाकरण चेटीकडून २००८ रुपये उसने आणले असतील व पनाकरण चेटीलाच यावर्षी दिव्याचा भक्ता मिळाला असेल, पण याबद्दल मला विशेष महिती नाहीं, कारण तें माझे काम नव्हे. अठरा महिन्यापूर्वी वीस एकर बागायत जमीन मी स्वतः खरेदी केली नाहीं; पण तितकी

जमीन माझ्या बायकोनें खरेदी केली. या खरेदीकरितां लागणारा पैसा रस्तेदुरुस्ती बाबत मक्तेदारांकडून कमिशन रूपानें मला मिळाला होता हें खरें नव्हे. मुशियम नांवाच्या माणसाची मला माहिती आहे. त्याची तीन वर्षांची मुलगी गेल्या जानेवारीला पाण्यांत बुडून मेली हें खरें आहे. पाण्यानें तुडूंब भरलेल्या एका गटारामध्यें पडून ती मेली का, ह मला माहीत नाहीं."

बक्षीसाहेबांची जबानी संपली व वादी नगरसभेतर्फें पुरावाही संपला.

नंतर दोन्ही वकिलांच्या तक्रारी झाल्या.

**वादी-वकील**—"सन्मान्य न्यायाधीशसाहेब ! लांबलचक तक्रारी करून आपणांला त्रास द्यावयाची माझी इच्छा नाहीं. झालेल्या पुराव्यावरून नगरसभेला कर मागायला अधिकार नाहीं, ही गोष्ट प्रतिवादीतर्फें शाबीत झालेली नाहीं. माझ्या विद्वान् मित्रानीं म्युसिपल गटारामधील चिखलाचा उल्लेख केला; पण मला असें म्हणावेसें वाटतें कीं, नगरसभेच्या सर्व गटारांमध्यें जितका चिखल आहे त्यापेक्षां जास्त चिखल माझ्या विद्वान् मित्रांनीं आज या कोर्टांत उडविला आहे. या शहरांतील सन्मान्य नागरिकांवर व आमच्या या शहराच्या कीर्तिवर जीं बेजबाबदार विधानें उधळण्यांत आलीं आहेत, त्यांचा जितक्या कठोर शब्दानें निषेध करतां येईल तितका जर मी केला नाहीं, तर माझे पक्षकार व या गांवचे सन्मान्य नागरिक यांच्या बाबतच्या कर्तव्यांत मी चुकलों असें होईल. अत्यंत गंभीरपणानें मला असें प्रतिपादन करावयाचें आहे कीं माझ्या विद्वान् मित्रांचा उलट तपास म्हणजे बेअदबी कृत्यांची एक मालाच होती. माझ्या विद्वान् मित्रांना मी असें आव्हान करूं शकतों कीं, आपलीं विधानें त्यांनीं या कोर्टाच्या चार भिंतीच्या पलीकडे करावींत. हें जर आव्हान स्वीकारण्यांत आलें तर तर माझी अशी खात्री आहे कीं, माझे विद्वान् मित्र वकील म्हणून कोर्टांत न येतां आरोपी म्हणून येतील. जे सन्मान्य नागरीक आपल्या नगरसभेकरता अत्यंत स्वार्थत्याग करतात, त्यांच्याबद्दल असली बेजबाबदार भाषा वापरणें हें खरोखर अत्यंत निंद्य आहे. आणखी असें म्हणता येईल कीं, या कज्जाचें कामीं असलीं बेजबाबदार विधानें गैरलागू आहेत. या म्युनिसिपालिटीला कायद्यानें

कर बसविण्याचा अधिकार दिलेला आहे. आणि तो कराचा पैसा चांगल्या तऱ्हेनें खर्च होत नाहीं, या सबबीवर कर देत नाहीं, असें कोणालाही वाटणार नाहीं. या सबबीवर कर देत नाहीं, असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. म्हणूनच मला अशी खात्री आहे कीं, या कज्जांत आपण वादीच्या वतीनें निकाल द्याल."

**प्रतिवादी-वकील**—"माझ्या विद्वान् मित्रानीं रागाच्या भरांत माझ्याबद्दल जीं विधानें केलीं आहेत, त्याबद्दल मी त्यांच्यावर रागावूं इच्छित नाहीं. अशी एक जुनी म्हण आहे की, 'ज्यावेळीं तुमची बाजू लंगडी असेल, त्यावेळीं तुम्हीं दुसऱ्या बाजूच्या वकिलाची निंदा करावी.' माझी स्वतःची बाजू उत्तम असल्यामुळें माझ्या विद्वान् मित्रांची मी निंदा करूं इच्छित नाहीं. माझें म्हणणें असें आहे कीं, आमची नगरसभा ही कायद्याच्या भाषेंत नगरसभा नाहीं. या नगरसभेच्या सभा मारामारीशिवाय केव्हांच पार पडत नाहींत व जर यदाकदाचित मारामारीशिवाय पार पडल्या, तर त्या सभांमध्यें नागरिक हिताशिवाय भलत्याच कसल्यातरी विषयाबद्दल चर्चा केली जाते. सर्व नागरिकांकडून निःपक्षपातीपणानें कर घेण्याऐवजीं नगरसभेशीं संबंध नसलेल्या इतर लोकांच्यावरच कराचें सर्व ओझें लादण्यांत येतें व स्वतः नगरसभासभासद मात्र कोणीच कर देत नाहींत. सन्मान्य कोर्टाला मला अशी विनंती करावयाची आहे कीं, माझा पक्षकार हें भांडण भांडत आहे तें केवळ स्वतःकरितां नव्हे, तर दीन दुबळ्या गरीब नागरिकाकरितां हें भांडण आहे. म्हणून माझी आपणांला अशी विनंती आहे कीं १९ रु १५ आ. ११ पै वसूल करण्याकरिता नगरसभेनें लावलेला हा दावा खर्चासुद्धां रद्द करण्यांत यावा."

उभय पक्षकारांतर्फे तक्रारी आल्यानंतर न्यायाधीशसाहेबांनीं खालीलप्रमाणें निकाल दिला—

"या कज्जामध्यें बरीच चुरस व फार वादावादी झाली, परंतु कज्जांत उत्पन्न होणारे मुद्दे साधे व सोपे आहेत. पहिला मुद्दा असा कीं, या नगरसभेचा कारभार अशा तऱ्हेनें चालला आहे का, कीं, ज्या योगानें या नगरसभेला कायद्याच्या भाषेंत नगरसभा म्हणतां येणार नाहीं. दुसरा मुद्दा असा कीं, जरी प्रतिवादीचीं विधानें खरीं असलीं तरी कर देत नाहीं, असें त्याला कायद्यानें म्हणतां येईल काय?

"दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, नगरसभेची व्याख्या कायद्यामध्यें दिलेली नाहीं– म्हणूनच कायदेमंडळानें ठेवलेली ही उणीव भरून काढण्याचें काम कोर्टावर पडलेलें आहे. माझ्यामतें नगरसभा म्हणजे एक संस्था कीं, ज्या संस्थेला नागरिकाच्या मानसिक, धार्मिक व शारिरीक गरजा भागविणें व याकरितां कर बसविणें अशा बद्दलचा अधिकार कायद्यानें दिलेला असतो. चांगलें पाणी, चांगले रस्ते, चांगली गटारें व चांगली शासनव्यवस्था हीं नगरसभेचीं मुख्य कामें आहेत. हीं कामें वादी नगरसभा करते का, हा मुख्य प्रश्न आहे. ज्या नगरसभेमध्यें स्पेनमधील गाढवांबद्दल कितीतरी तास विचार होतो, त्या नगरसभेला 'नगरसभा' म्हणतां येईल काय? ज्या नगरसभेमध्ये होणाऱ्या सभा मारामारीमध्यें पार पडतात, जी नगरसभा इतर लोकांकडून कर वसूल करते, पण स्वतःच्या सभादांवर कराचें ओझें लादूं इच्छित नाहीं, जी नगरसभा अध्यक्ष व सभासद यांना उपयोगी असणारे रस्ते तेवढेच दुरुस्त करते, ज्या नगरसभेचा पैसा मक्तेदार व इतर लोक यांच्या खिशांत अन्यायानें जातो, अशा नगरसभेला कायद्याच्या कोर्टांत नगरसभा म्हणतां येईल काय? माझें असें ठाम मत आहे कीं, अशा नगरसभेला नगरसभा म्हणतां येणार नाहीं.

"कायद्यानें सभासदांना दिलेलें अधिकार मोठे आहेत, पण हे अधिकार अमर्यादित नाहींत. नगरसभेचा एखादा सभासद हिटलर व मुसोलीनी होऊं म्हणेल, तर कायद्यानें तें शक्य नाहीं. नगरसभेच्या सभासदांना बऱ्याच विषयांची चर्चा करावी लागते; पण जनरल फ्रँकोच्या गाढवाबद्दल चर्चा करावयाचें सभासदांना कांहींच प्रयोजन नाहीं, असें मी म्हटलें तर त्यांत कांहीं चूक होणार नाहीं. नगरसभेबद्दल कांहींतरी विधानें करून आपण कर द्यावयास तयार नाहीं, असें नागरिकांना म्हणतां येणार नाहीं; पण ज्याकरितां नगरसभेचा जन्म झाला, त्या गोष्टी करण्याचें सोडून नगरसभा कांहीं भलत्याच गोष्टी करूं लागेल, तर अशा नगरसभेला कर देत नाहीं, असें म्हणणें रास्त ठरणार नाहीं काय?

"कर देत नाहीं, असें म्हणण्यांत प्रतिवादीचा वाईट हेतु असेल; परंतु एका न्यायाधीशानें म्हटल्याप्रमाणें मनुष्याचें मन केवळ देवच जाणूं शकतो. ती

दैवी शक्ति कोणत्याही कोर्टाजवळ नसल्यामुळें केवळ माणसांच्या कृत्याकडे बघूनच कोर्टांनीं न्याय करावयाचा असतो. या कामीं प्रतिवादीचा काय हेतू आहे असल्या खोल पाण्यांत न शिरतां प्रतिवादीचें कृत्य काय आहे, हें पाहिलें तर, असल्या नगर-सभेविरुद्ध त्यानें जी जोरदार बाजू मांडली आहे, त्याबद्दल मला वाटतें, तो खरोखर स्तुतीस पात्र आहे.

"झालेल्या सर्व पुराव्यावरून व सर्व साधक बाधक गोष्टींचा विचार करून हा नगरसभेचा दावा मी रद्द करतों, आणि असें फर्मावितों कीं, प्रतिवादीचा खर्च—नगरसभेच्या अध्यक्षांनीं नगरसभेच्या पैशांतून न देतां स्वतःच्या पैशांतून द्यावा. मला असें म्हणावेसे वाटतें कीं, ज्यावेळीं ही नगरसभा खरीखुरी नगरसभा होईल, त्यावेळीं पहिल्या प्रथम ओव्हरसिअर—बक्षीसाहेब यांना नोकरीवरून कमी करण्यांत यावें."

सर्व कोर्टाच्या आवारांत पांच मिनिटेपर्यंत जोराच्या टाळ्या.

# १९

# बिनामीचा व्यवहार

सकाळी घरगुती टपाल चाळींत असताना एकदम एका पाकिटावर माझें लक्ष गेलें. एका स्त्रीनें तें पाकीट लिहिलें होतें; व आपली हकीगत सविस्तर देऊन बिनामीच्या व्यवहाराबद्दल कायदा काय म्हणतो अशी पृच्छा केली होती.

नवऱ्यानें जर बायकोच्या नांवें एकादी इस्टेट विकत घेतली असेल तर कायद्याप्रमाणें ती इस्टेट त्या बायकोचीच ठरली पाहिजे असें त्या स्त्रीचें म्हणणें होतें. बिनामीच्या व्यवहाराबद्दल कायद्याचे जे निरनिराळें प्रश्न तिनें आपल्या पत्रांत उपस्थित केलें होतें, तें पाहून कोणाही कायदेपंडिताची करमणूक झाली असती.

मला वाटलें, लेखिकेनें जे प्रश्न उपस्थित केले आहेत, त्यांचीं स्वतःच उत्तरें देण्यापेक्षा एकादा असा हायकोर्टाचा ठराव पहावा कीं, त्यामध्ये त्या सर्व प्रश्नांचा उलगडा पहावयास मिळेल.

निरनिराळ्या हायकोर्टांचे निरनिराळे ठराव मी पाहूं लागलों आणि शेवटीं ज्या स्वरूपाचा ठराव मला पाहिजे होता तो मिळाला. त्या ठरावाचें नांव—

**"चंचलादेवी वि. पूरी बँक"**

**( १९५१–ऑल इंडिया रिपोर्टर–ओरिसा–पान २२. ) असें आहे.**

कायद्याची क्लिष्ट भाषा सोडून याची हकीकत थोडक्यांत द्यावयाची झाल्यास अशी देतां येईल—

बनमाली नांवाचा एक अत्यंत गरीब इसम होता त्याला एका श्रीमंत बाईकडे नोकरी लागली. त्यानें त्या बाईचा विश्वास संपादन केला. त्या बाईनें आपल्या इस्टेटीचा कारभार त्याच्याकडे सोंपविला. बनमालीच्या हातीं हळूं हळूं पैसा खेळूं लागला. जसजसा पैसा हातीं येत गेला, तसतशी इस्टेट विकत घेण्यास त्यानें सुरवात केली. त्याच्या बायकोचें नांव गौरीदेवी होतें. त्यानें सर्व इस्टेट गौरीदेवीच्या नांवानें विकत घेतली.

बनमालीला मुलें व मुली होत्या, त्याला मध्यंतरी पैशाचें काम पडल्यामुळें त्यानें बॅंकेकडून कर्ज काढलें. त्या कर्जाबाबत बॅंकेनें बनमाली व त्याची मुलें यांच्यावर दावा लावून हुकूमनामा मिळविला. त्या हुकूमनाम्याच्या अंमलबजाणींत बॅंकेनें वादांतील इस्टेट ( बनमालीनें गौरीदेवीच्या नावानें विकत घेतलेली इस्टेट ) जप्त केली. बनमालीच्या मुलींनीं ( चंचलादेवी वगैरे ) त्या जप्तीस हरकत घेतली. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, जप्त झालेली इस्टेट त्यांच्या आईची असल्यामुळें बापावरील हुकूमनाम्याच्या अंमलबजावणींत ती इस्टेट जप्त होऊं शकत नाहीं. स्त्रीधन वारस ह्या नात्यानें आपण त्या इस्टेटीचे मालक आहोंत असेंही त्या मुलींचें म्हणणें होतें.

मुलींची हरकत नामंजूर झाल्यामुळें त्यांनीं आपली मालकी प्रस्थापित करण्यासाठीं सिव्हिल प्रोसीजर कोडच्या ऑ. २१ रूल ६३ अन्वये दिवाणी दावा लावला. तो दावाहि अव्वल कोर्टानें फेटाळून लावला म्हणून त्यांनी हें अपील केलें होतें.

वादांतील इस्टेट गौरीदेवीच्या मालकीची आहे कीं बनमालीच्या मालकीची आहे हें आपल्याला ह्या अपीलांत पहावयाचें आहे. म्हणजे असें कीं, गौरीदेवी ही केवळ बिनामीदार आहे किंवा काय हें आपल्याला ठरवावयाचें आहे.

गौरीदेवी ही बिनामीदार होती व बनमाली हा खरा मालक होता असें बॅंकेचें म्हणणें आहे. गौरीदेवी बिनामीदार आहे हे सिद्ध करण्याची जबाबदारी बॅंकेवर आहे.

एखादा व्यवहार बिनामीचा आहे किंवा नाहीं हें ठरवितांना त्या व्यवहारास पैसा कोणी दिला हें पहावयाचें असतें.

नवरा जिवंत असतांना बायकोच्या नांवानें इस्टेट विकत घेण्यांत आली एवढ्यावरून बायको बिनामीदार होती व नवरा खरा मालक होता असें अनुमान काढतां येत नाहीं. त्याचप्रमाणें विवाहित स्त्रीपाशीं इस्टेट विकत घेण्यासाठीं स्वतःचा पैसा असूं शकत नाहीं असेंही आपल्यास गृहीत धरतां येत नाहीं.

खरेदीखत बायकोच्या नांवचें आहे. परंतु खरेदीसाठीं नवऱ्यानें पैसा दिला असें सिद्ध झालें तरच बायको बिनामीदार ठरतें असे १९४६ ऑल इंडिया रिपोर्टर, मुंबई १५७; रतनचंद वि॥ देवचंद ह्या निवाड्यांत ठरविण्यांत आले आहे.

फेडरल कोर्टानें बिनामीसंबंधींचा कायदा १९४९ ऑ. इं. रि. फे. को. ८८, गंगाधर वि॥ सुब्रमण्य ह्या निवाड्यांत स्पष्ट केला आहे. त्या निवाड्यांत फेडरल कोर्टानें असें म्हटलें आहे—

"अमुक व्यवहार बिनामीचा आहे असें ज्या इसमाचें म्हणणे असेल त्या इसमानें तो व्यवहार बिनामीचा आहे ही गोष्ट सिद्ध केली पाहिजे. व्यवहार बिनामीचाच आहे ही गोष्ट विश्वसनीय व कायदीय पुराव्याच्या साहाय्यानें सिद्ध झाली पाहिजे. ती गोष्ट जर त्या रीतीनें सिद्ध झाली नाहीं तर ज्या इसमाच्या नांवानें खरेदीखत असेल तोच इसम खरा मालक आहे असें म्हटलें पाहिजे. पैसा कोणी दिला ही गोष्ट बिनामीचा प्रश्न निकालांत काढतांना अत्यंत महत्वाची असतें."

प्रस्तुतच्या मुकदम्यांत पुराव्यानें पुढील गोष्टी सिद्ध झाल्या आहेत—

(१) वादांतील इस्टेट विकत घेतली त्या सुमारास बनमालीपाशीं पुष्कळ पैसा होता;

(२) खरेदीखतांचा भरणा बनमालीच्या हातानें देण्यांत आला;

(३) वादांतील इस्टेटीच्या दुरुस्ती वगैरेसाठीं बनमालीनें पैसा खर्च केला;

(४) गौरीदेवीपाशीं स्वतःचा पैसा नव्हता.

वरील पुराव्यावरून असाच निष्कर्ष निघतो कीं, बनमालीनें आपल्या पैशानें वादांतील इस्टेट विकत घेतली व गौरीदेवी ही बिनामीदार आहे. चंचला-देवीचें म्हणणें असें आहे कीं गौरीदेवी बिनामीदार होती असें जरी आपण गृहीत

धरलें, तरी ज्याअर्थी बनमालीनें गौरीदेवीच्या हितासाठीं वादांतील इस्टेट विकत घेतली, त्याअर्थी गौरीदेवी हीच खरी मालकीण ठरते.

ह्या युक्तिवाद आम्हाला पटत नाहीं. नवऱ्यानें बायकोच्या नांवानें इस्टेट विकत घेतली असेल तर बायको बिनामीदार आहे असें गृहीत धरतां येतें; परंतु ती इस्टेट नवऱ्यानें बायकोसाठीं विकत घेतलीं असें गृहीत धरता येत नाहीं; असें प्रीव्हिकौन्सिलनें अनेक निवाड्यांत ठरविलें आहे. त्याचा अर्थ असा कीं, नवऱ्यानें बायकोसाठीं इस्टेट विकत घेतली असें सिद्ध झालें तरच ती इस्टेट बायकोच्या मालकीची ठरूं शकतें. इस्टेट विकत घेण्यांत नवऱ्याचा उद्देश काय होता ही गोष्ट महत्त्वाची असते. ह्या विषयावर १९३८ ऑ. इं. रि. मद्रास ८; सीतम्मा वि॥ सीतापति हा निवाडा मार्गदर्शक आहे. त्या निवाड्यांतील हकीकत अशी होती– एका इसमानें एक मुलगा दत्तक घेतला. दत्तक मुलाशी आपल्या बायकोचें जर पटलें नाहीं तर तिनें काय करावें ह्या विषयीचा खुलासा त्यानें दत्तकपत्रांत केला होता. त्यानंतर त्या इसमानें आपल्या बायकोच्या नांवानें इस्टेट विकत घेतली. दत्तक मुलगा त्या इस्टेटीवर हक्क सांगू लागला. मद्रास हायकोर्टानें असें ठरविलें कीं, ती इस्टेट दत्तक मुलाला मिळूं शकत नाहीं; कारण कीं, दत्तक बापानें आपल्या बायकोच्या हितासाठीं ती इस्टेट विकत घेतली होती असें दत्तकपत्रांतील बेबनावासंबंधीच्या उल्लेखावरून सिद्ध होतें.

प्रस्तुतच्या मुकदम्यांतील इस्टेट बनमालीने गौरीदेवीच्या नांवानें घेतली असली तरी तिच्यासाठीं त्यानें ती विकत घेतली असें सिद्ध करणारी एकही गोष्ट उपलब्ध नाहीं. सर्व खरेदीखते बनमालीच्या ताब्यांत होती, दुरुस्तीवगैरेसाठीं बनमालीनेंच पैसा खर्च केला, व सर्व देखरेख बनमालीच करीत होता. ह्यावरून हेंच सिद्ध होतें कीं, बनमाली हाच खरा मालक होता व गौरीदेवी ही बिनामीदार होती. गौरीदेवीनें आपल्या हयातींत वादांतील इस्टेटीचा ताबा घेतला नाहीं व देखरेखही केली नाहीं. तिच्या मृत्यूनंतर तिच्या मुलींनींही इस्टेटीचा ताबा घेतला नाहीं. वरील कारणास्तव आम्ही चंचलादेवीचें हें अपील फेटाळून लावतों व वादांतील इस्टेट बनमालीच्या मालकीची आहे. असा खालच्या कोर्टानें जो निकाल दिला आहे तो कायम ठेवतों.

## २०

# दागिन्यांचा डबा

दागिन्यांचा डबा म्हटला कीं, बायकांना कमालीचें औत्सुक्य व पराकाष्टेची आपुलकी वाटते. दागिन्यांच्या डब्याबद्दल साहित्याच्या प्रांतांत ज्याप्रमाणें आपण कांहीं कांहीं मजेशीर गोष्टी वाचतों, त्याचप्रमाणे कायद्याच्या प्रांतांत देखील कांही कांहीं मजेशीर कज्जे वाचावयास मिळतात. त्रिवेणीबाई वि. सरकार ( १९४६ नागपूर लॉ जर्नल पान २२१ ) हा कज्जा अशाच तऱ्हेचा आहे. कायद्याची क्लिष्ट भाषा सोडून याची हकीकत थोडक्यांत अशी देता येईल:—

मोर्शी तालुक्यातील एका गढीवर त्रिवेणीबाईच्या मालकीचें एक घर होतें तिनें त्या घराची एक भिंत मजुरांमार्फत पाडविली. मजूर भिंत खणीत असताना त्या भिंतींतून दागिन्याचा एक डबा पटकन पडला. त्रिवेणीबाईंनी तो डबा पटकन उचलला व आपल्यापाशीं ठेवून घेतला. त्रिवेणीबाईंना दागिन्यांचा डबा सांपडला ही गोष्ट सर्व गांवांत पसरली. पोलीसांनाही ती गोष्ट कळली. पोलीस अधिकाऱ्यांनी त्रिवेणीबाईची भेट घेतली व दागिन्यांचा डबा सरकारांत दाखल करण्यास सांगितलें. तो डबा आपल्या मालकीचा असल्यामुळें आपण तो सरकारांत दाखल करण्यास तयार नाहीं असें त्रिवेणीबाईनें सांगितलें. सबब, सरकारने

तिच्यावर गुप्त धनाच्या कायद्याच्या कलम ४ व २१ अन्वयें खटला भरला. सरकारचें म्हणणें असें होतें कीं, तिला सांपडलेला डबा " गुप्त धन " असल्यामुळें तिनें तो डबा सरकारांत दाखल करावयास पाहिजे होता व तिनें तो डबा सरकारांत दाखल न केल्यामुळें तिनें कलम ४ व २१ अन्वयें गुन्हा केला आहे असें ठरतें. उलटपक्षीं त्रिवेणीबाईचें म्हणणें असें होतें कीं, तो डबा तिच्या नवऱ्यानें लपवून ठेवला होता व तो तिला सांपडला. सबब, तो गुप्त धनाच्या सदरांत येत नसल्यामुळें तिच्या हांतून कोणताही गुन्हा झालेला नाहीं. खालच्या दोन्ही कोर्टांनीं त्रिवेणीबाईचें म्हणणें अमान्य करून, तिला दोषी ठरविलें व दंडाची शिक्षा देऊन तो डबा सरकारजमा करण्यांत यावा असा हुकूम दिला. त्या हुकुमावर तिनें हायकोर्टाकडे तपासणी अर्ज केला.

त्रिवेणीबाईला सापडलेला डबा गुप्त धनाच्या सदरांत येतो किंवा काय हें आपल्याला पहावयाचें आहे, " गुप्त धन " ह्या शब्दाची व्याख्या कलम ३ मध्यें अशी देण्यांत आली आहे. " जमिनींत अथवा जमिनीवर लपवून ठेवलेली कोणतीही ' मौल्यवान वस्तु ' अशी ' गुप्त धन ' ह्या शब्दाची व्याख्या आहे. ज्यास गुप्त धन सांपडलें असेल त्यानें काय केलें पाहिजे ह्याची तरतूद कलम ४ मध्यें करण्यांत आली आहे. ज्यास १० रुपयांहून अधिक किंमतीची कोणतीही मौल्यवान वस्तु ' सांपडली ' असेल त्यानें शक्य तितक्या लवकर त्या बाबतची खबर कलेक्टरला दिली पाहिजे असें कलम ४ मध्यें म्हटलें आहे.

" गुप्त धन " व " ज्यास गुप्त धन सांपडलें आहे तो इसम " ह्या दोन शब्दांचा डिक्शनरींतील ( शब्दार्थ कोष ) अर्थ विचारांत घेतल्यास आपल्यास असें दिसून येईल कीं, ज्या धनाच्या अस्तित्वाची जाणीव अथवा माहिती कोणासच नाहीं अशा धनासच गुप्त धन म्हटलें पाहिजे. त्याचप्रमाणें ज्यास कांहीं एक कल्पना नसतांना आकस्मिक रीतीनें धन सांपडले आहे अशाच इसमास तें ' सांपडलें ' असें म्हणतां येईल. सबब, त्रिवेणीबाईला सांपडलेला डबा गुप्त धन ठरतो किंवा काय व वरील अर्थानें तो तिला ' सांपडला ' असें म्हणतां येतें किंवा काय हें आपल्याला पहावयाचें आहे. त्रिवेणीबाईचें म्हणणें असें आहे कीं, डब्यांत सांपडलेले दागिने तिच्या मालकीचें होते व तें दागिनें तिच्या नवऱ्यानें

एका डब्यांत घालून तो डबा भिंतींत लपवून ठेवला होता. डबा लपवून ठेवला होता हें आपल्यास ठाऊक होतें व म्हणून भिंत खणणाऱ्या मजुरांना आपण त्याबाबत आगाऊच कळविलें होतें व खणतांना एखादी वस्तू सांपडल्यास त्याबाबतची खबर ताबडतोब देण्यास आपण त्या मजुरांना सांगितलें होतें असें त्रिवेणीबाईचें म्हणणें आहे. डबा सांपडला त्यावेळीं हजर असलेल्या एका इसमाची साक्ष सरकारने घेतली आहे. तो इसम म्हणजे एक मजुर होता. त्रिवेणीबाईच्या म्हणण्यास त्यानें पुष्टि दिली आहे. सबब सरकारनेंच त्रिवेणीबाईचे म्हणणें सिद्ध केलें आहे असें ठरतें. अशा परिस्थितीत वादांतील दागिन्यांचा डबा 'गुप्त धन' ठरत नाही व त्रिवेणीबाईही "गुप्तधन सांपडणारी बाई" ठरत नाहीं. आम्ही असे कां ठरवितों त्याचें कारण रोजच्या व्यवहारांतील एक उदाहरण दिल्यास अगदीं उघड होईल. एका चोरानें चोरीचा माल एका शेतांत गाडून ठेवला आहे असें आपण गृहीत धरूं. तो माल शेतांत गाडून ठेवला आहे हे एकट्या त्या चोरासच माहीत राहील, शेताच्या मालकास माहीत असणें अशक्यच आहे. अशा परिस्थितींत शेताचा मालक शेत नांगरीत असतांना जर त्यास तो माल सांपडला तर त्याच्यापुरतें त्या मालास 'गुप्तधन' म्हणतां येईल; कारण कीं, त्यास तो माल अकस्मित रितीने व आगाऊ कांहीं एक माहीती नसतांना सांपडला आहे. सबब, शेतकऱ्याच्या बाबतींत गुप्तधनाचा कायदा लागू पडेल. परंतु हा नियम चोराच्या बाबतींत लागू पडणार नाहीं. आतां आपण घटकाभर असें समजूं कीं, चोरास पोलीसांनीं पकडलें आहे. व पोलीसांच्या धाकदपटशास भिऊन चोरानें गुन्ह्याची कबुली दिली आहे. कबुली दिल्यानंतर मुद्देमाल दाखविण्यासाठीं चोरानें पोलीसांस त्या शेतांत नेलें आहे, परंतु त्या शेतातील नक्की कोणत्या ठिकाणीं माल गाडून ठेवला आहे तें ठिकाण त्यास ओळखतां आलें नाहीं तर तो निरनिराळ्या ठिकाणीं खणून पाहील व सरते शेवटीं त्यास माल सांपडेल. अशा प्रकारें त्यास सांपडलेला माल त्याच्या दृष्टीनें गुप्तधन ठरणार नाहीं; कारण कीं, तें धन त्या शेतांत आहे हें त्यास नक्की माहीत होतें. त्यास तें धन अकस्मित रितीनें सांपडले असेंही म्हणतां येत नाहीं. नक्की कोणत्या जागीं धन पुरून ठेविले आहे त्याचें त्यास विस्मरण पडल्यामुळें त्यास त्या ठिकाणाचा

तपास लावण्यासाठीं निरनिराळया ठिकाणी खणून पहावे लागलें, तरी त्यास गुप्त धनाच्या कायद्याच्या अर्थानें तें धन "सांपडले" असे म्हणतां येणार नाहीं. हें उदाहरण त्रिवेणीबाईच्या बाबतींत पूर्णपणे लागू पडतें. आपल्या नवऱ्यानें घरच्या भिंतींत दागिन्यांचा डबा लपवून ठेवला आहे हें त्रिवेणीबाईला माहीत होतें; परंतु भिंतींतील नक्की कोणत्या ठिकाणीं तो डबा लपवून ठेवला आहे हें तिला ठाऊक नसल्यामुळें तिनें ती भिंत खणावयास लावली. अशा परिस्थितींत त्या डब्याला "गुप्त-धन" म्हणतां येणार नाहीं. व त्रिवेणीबाईला तें "सांपडलें" असेंहि म्हणतां येत नाही. सबब, त्रिवेणीबाईला गुप्त धनाबाबतच्या कायद्यांतील कोणत्याही कलमानुसार दोषी ठरवितां येत नाहीं. खणतांना ज्या मजुरास तो डबा सांपडला त्यानें मात्र त्या बाबतची माहिती कलेक्टरकडे द्यावयास पाहिजे होती. परंतु प्रस्तुतच्या तपासणी अर्जामध्यें आपल्याला त्या मजुरावरील जबाबदारीचा विचार करण्याची गरज नाहीं. वरील कारणास्तव आम्हीं हा तपासणी अर्ज मंजूर करून त्रिवेणीबाईला निर्दोषी ठरवून सोडून देतों व दागिन्यांचा डबा तिला परत करण्यांत यावा असा हुकूम देतों.

## २१

# छडी वाजे छम् छम्.

### बाळाराम वि. सिताराम.

हेडमास्तरानें विद्यार्थ्यास छड्या मारल्या . . ३२३ प्रमाणें फिर्याद... न्याय पंचायत कोर्टाने शिक्षा दिली...वरच्या कोर्टात काम...कायद्याचें विवेचन ...इं. पी. को. क. ८८ व ८९ संबंधी उहापोह...योग्य निकाल.

" छडी वाजे छम् छम् विद्या येई घम् घम् " अशी पूर्वी म्हण होती. पण हल्लींच्या काळीं या म्हणीमध्यें लोकांना कांहींच अर्थ वाटत नाहीं. उलट या म्हणीवर विश्वास ठेवणाऱ्या एका सद्गृस्थाला न्यायदरबारांत दडाची शिक्षा झाली.

त्या सद्गृहस्थाचे नांव सिताराम. बिरनाळ गांवच्या शाळेमध्यें सिताराम हेडमास्तराचे काम करीत होता. आचरणानें फार उत्तम व शिस्तीच्या बाबतींत अत्यंत कडक अशी त्याची ख्याती होती. बिरनाळ गांवचा पुढारी बाळाराम हा सितारामचा लहानपणाचा जिवश्च कंठश्च स्नेही होता. पण पुढें त्यांच्यामध्यें कमालीचें मतभेद सुरूं झाले. मतभेदाचें भांडणांत रूपांतर झालें व भांडणाचा शेवट शत्रुत्वांत झाला.

बाळारामनें जेव्हां न्यायपंचायतीच्या कोर्टात सितारामवर फौजदारी फिर्याद लावली तेव्हां ज्याच्या त्याच्या तोंडी ती फिर्याद म्हणजे एक चर्चेचा विषय झाला. त्या फिर्यादीची पार्श्वभूमि बरीच मनोरंजक होती. ह्याच पार्श्वभूमीबद्दल गांवांत जिकडे तिकडे चर्चा सुरू होती व याच पार्श्वभूमिला अनुलक्षून न्यायपंचायतीच्या कोर्टांत पुरावा देखील देण्यांत आला होता.

त्या पार्श्वभूमिचें स्वरूप थोडक्यांत असें होतें......

बाळाराम व सिताराम एकाच वयाचे, एकाच गांवात रहाणारे व एकाच शाळेंत शिकलेले. पुढें बाळाराम कॉंग्रेसमध्यें शिरला व आपल्या गावचा पुढारी झाला, तर सितारामनें मास्तरची नोकरी पतकरली व पुढें तो हेडमास्तर झाला. एकदां एका व्याख्यानांत बाळारामनें कम्युनिस्टावर बरेंच तोंडसुख घेतलें. भाई लोकांना बराच शिव्या देऊन तो म्हणाला..." या भाई लोकाना धर्म म्हणजे अफूची गोळी वाटते. देवावर यांचा विश्वास नाहीं, आमचे प्राचीन पडित या भाई लोकांना बावळट व खुळचट वाटतात यांची प्रार्थना जर कोणती असेल तर ती हीच कीं......

" नमो मार्क्स सुरेशाय । नमो लेनिन महात्मने ॥
नमो स्टॅलीन महाराजे । पाहि मां सर्वदा सदा ॥"

बाळाराम पुढें म्हणाला कीं, " भाई लोक नास्तिक आहेत ! हे देशाचा घात केल्याशिवाय कधी रहाणार नाहींत; माझ्यासारखे कॉंग्रेसचे लोक आस्तिक आहेत. आम्हींच फक्त देशाचें कल्याण करूं "

बाळारामचें हें व्याख्यान कांहीं लोकांना आवडलें. सितारामाला मात्र आवडलें नाहीं. घरीं आल्यावर तो बाळारामला म्हणाला, " अशा तऱ्हेनें दुसऱ्यांना शिव्या देऊन स्वतःच्या दोषावर पांघरूण घालणें तुला शोभत नाहीं ! जगामध्ये अंतःकरणाला जास्तींत जास्त किंमत आहे. मला असें वाटतें कीं, देव मूर्तांत नसून अंतःकरणांत आहे. जो अंतःकरणाशीं प्रामाणिक आहे तोच आस्तिक व जो असा प्रामाणिक नाहीं तो नास्तिक. "

सितारामचा उपदेश बाळारामला पटला नाहीं. त्याने सितारामला नास्तिक ठरविलें व म्हटलें " तूं माझा जिगरदोस्त आहेस, पण तुझ्यासारख्या नास्तिका-

बरोबर माझ्यासारख्या आस्तिकानें संबंध ठेवणे बरें नव्हे" यावर सितारामनें उत्तर दिले ... "अरे! तूं काळाबाजार करून वाटेल तितका पैसा मिळवितो आहेस! वाटेल ती काळी कृत्ये करून पुढारीपणाचा टेंभा मिरवितोस आहेस! आणि इतकें असूनही स्वतःला आस्तिक म्हणवून घेतोस!"

सितारामचें हें शब्द बाळारामला फार झोंबलें व त्या दिवसापासून दोघांच्या मध्यें अबोला सुरूं झाला. बाळाराम व त्याचे शिष्य सितारामची नास्तिक म्हणून कुचेष्टा करूं लागले.

एकदा बिरनाळ गांवी स्वामी देवानंद याचे शाळेच्या आवारांत प्रचंड जनसमुदायापुढें व्याख्यान झाले शाळेचा हेडमास्तर सिताराम नास्तिक आहे, सबब शाळेच्या आवारात स्वामी देवानंदानी व्याख्यान देऊ नये अशाबद्दल बाळाराम व त्याचे भक्तगण यानीं बरीच खटपट केली पण त्या खटपटीला यश आले नाहीं.

स्वामी देवानंदानीं वेदातील मत्र म्हणून आपल्या व्याख्यानाला सुरवात केली. वेदांतील उतारे म्हणून त्यानी असे सांगितलें कीं ... "देव देवळांत नाहीं. अथवा मूर्तीत नाहीं. क्षेत्रांत नाहीं अथवा तीर्थात नाहीं, तर तो आपल्या हृदयांत आहे. वैदिक मूनींनीं जे ग्रंथ लिहिले त्यांचे खरेखुरे सार हेच आहे कीं, जे आपल्या अंतःकरणाशीं प्रामाणिक आहेत ते आस्तिक व अंतःकरणाशीं प्रामाणिक नसणारे नास्तिक."

व्याख्यानामध्यें स्वामी देवानंदानीं पुढें असें म्हटलें की, "तुमच्या शाळेचे हेडमास्तर सिताराम यांना लोक नास्तिक म्हणतात, पण खऱ्या अर्थानें पाहूं गेल्यास तेच खरे आस्तिक आहेत...आज आपण रामराज्याच्या गोष्टी बोलतो पण या बाबतींत आपण असें लक्षांत ठेवा कीं, जोपर्यंत अधिकारी, पुढारी, सत्ताधारी व मानधारी अंतःकरणाशीं प्रामाणिक होणार नाहींत तोपर्यंत राम राज्याची भाषा बोलणें म्हणजे टिटवीनें समुद्र आटविण्यासारखे हास्यास्पद आहे."

हे व्याख्यान बाळाराम व त्याचे भक्तगण यांना फारच झोंबले. त्यांनी निश्चय केला कीं, सितारामची चांगली खोड मोडली पाहिजे.

याच्या नंतर निराळाच एक प्रकार झाला. बाळारामाचा मुलगा पुंडाराम याने एकदां शाळेंत आपल्या वर्गाच्या मास्तरांना शिव्या दिल्या त्यावेळीं

सितारामने बाहेरून तो प्रकार पाहिला. शाळेची शिस्त कायम राखण्याकरिता सिताराम लगेच आंत गेला व त्यानें पुंडारामला छड्या मारल्या.

पुंडाराम घरीं गेल्यावर बाळारामला जेव्हा तो प्रकार कळला तेव्हां तानड-तोब बाळारामनें न्यायपंचायतीच्या कोर्टात सितारामवर पीनल कोडच्या कलम ३२३ प्रमाणें खटला भरला.

कोर्टात झालेला सर्व पुरावा पाहून पंचांना बाळारामची बाजू बळकट वाटली. बाळारामसारखा पुढारी आपल्या गावची उन्नती होण्याकरितां व देशामध्यें रामराज्य स्थापन होण्याकरितां स्वार्थत्यागपूर्वक खटपट करीत असताना सिताराम-सारख्या नास्तिकानें त्याच्या मुलाला छड्या माराव्यात याबद्दल सितारामला भरपूर दंड केला पाहिजे, असे पचाना वाटले. बाळारामतर्फे जो पुरावा झाला त्यामध्ये सितारामनें सहा छड्या मारल्या असें निष्पन्न झालें. सितारामचें म्हणणें असें कीं, शाळेची शिस्त कायम राखण्याकरिता व पुंडारामचें अंतिम कल्याण व्हावें या हेतूनें आपण त्याला फक्त दोन छड्या मारल्या. पंचानी ठरविले की, सितारामनें पुंडारामला चार छड्या मारल्या. पंचानी असा हिशोब केला कीं, प्रत्येक छडीबद्दल १० रुपये तरी दंड केला पाहिजे. असा हिशोब करून पंचानीं सितारामला ४० रुपये दंडाची शिक्षा दिली.

ह्या शिक्षेवर सितारामने जेव्हा तपासणी अर्ज केला तेव्हां वरच्या कोर्टानें बराच विस्तृत ठराव लिहीला. त्यामध्यें असें म्हटलें कीं......

"खालच्या कोर्टानें बाळारामची कॉंग्रेस भक्ति, गांधी प्रेम वगैरेबद्दल बरेच मोठे कथन केले आहे. या बाबतींत एवढेच म्हणता येईल कीं, कांग्रेससारख्या महान संस्थेचा आधार घेऊन व परमपूज्य महात्मा गांधी यांच्या नांवाचा फायदा घेऊन बाळाराम जीं कृत्ये करीत आहे तीं त्यांस भूषणावह खास नाहीत. परंतु या कज्जांत तो महत्त्वाचा प्रश्न नाहीं. खालच्या कोर्टानें सितारामला कलम ३२३ ( साधी दु:खापत ) अन्वयें दोषी ठरविले आहे. ते बरोबर आहे अगर नाहीं हाच प्रश्न या कज्जांत ठरविणेंचा आहे.

पुंडारामच्या हातावर आपण फक्त दोन छड्या मारल्या असे सितारामचें म्हणणें आहे. खालच्या कोर्टानें सितारामला चार छड्या मारल्या असें ठरविलें आहे. खालच्या कोर्टाचे या बाबतींतलें म्हणणें वादाकरितां मान्य करण्यास हरकत नाहीं.

विद्यार्थ्यांना दुरुस्त करण्यासाठीं अथवा शाळेची शिस्त कायम राखण्यासाठीं विद्यार्थ्यांना सौम्य स्वरूपाची शारीरिक शिक्षा देण्याचा हक्क इंग्लंडांतील कायद्यानें शिक्षकांना दिलेला आहे. हिंदुस्थानांत मात्र तसा कायदा अस्तित्वांत नाहीं. सबब आपल्याला पीनल कोडच्या दृष्टीनेच प्रस्तुतच्या मुकदम्याचा विचार करावा लागेल.

पीनल कोडच्या कलम ८९ मध्यें असें म्हटलें आहे कीं, ज्याच्या देखरेखी-खालीं एखादे १२ वर्षांचे मूल अथवा वेडसर इसम आहे त्या इसमानें (देखरेख-करणारा इसम) जर सद्हेतुनें अथवा त्या मुलाच्या अथवा वेडसर इसमाच्या हितासाठीं स्वत: एखादे कृत्य केलें असेल अथवा त्याचा स्पष्ट किंवा गर्भित संमतीनें दुसऱ्या एखाद्या इसमानें तसें कृत्य केलें असेल व त्या कृत्यामुळें त्या मुलाला अथवा वेडसर इसमाला इजा अथवा नुकसान पोचलें असेल तर तें कृत्य पीनल कोडच्या अर्थानें गुन्ह्याच्या सदरांत येणार नाहीं.

आईबाप, पालक व शिक्षक याना मुलें दुरुस्त करण्यासाठीं शारीरिक शिक्षा देण्याचा जो हक्क आहे तो हक्क मुंबईच्या १९२४ च्या मुलांबाबतच्या कायद्यानें जसाच्या तसा कायम ठेवला आहे. मुलें दुरुस्त व्हावीत ह्या उद्देशानें त्यांना शारीरिक शिक्षा देण्याचा हक्क शिक्षकांना असतो, ही गोष्ट कायद्यास देखील समंत आहे, असें ह्यावरून दिसून होईल. विद्यार्थी जोंपर्यंत शाळेंत आहे तोंपर्यंत तो शिक्षकाच्या हुकमतींत असतो व म्हणून विद्यार्थ्यांच्या बापाला जे हक्क प्राप्त झाले असतात ते हक्क शिक्षकालाही प्राप्त होत असतात हे उघड आहे. मुलाचा शाळेंत पाठवितानाच त्याच्या बापानें अथवा पालकानें त्या मुलाला शिक्षकाच्या हुकमतींत दिले, असें समजलें पाहिजे. पीनल कोडचें क. ८९ बारा वर्षांच्या आंतील मुलांच्या बाबतींत लागूं पडते. परंतु पुंडाराम १५ वर्षांचा असल्यामुळें त्याच्या बाबतींत क ८८ लागूं पडेल. ज्या इसमाच्या स्पष्ट अथवा गर्भित संमतीने, सद्हेतूनें व त्याच्याच हितासाठीं एखादें कृत्य केलें असेल व तें कृत्य प्राणघातक नसेल तर त्या कृत्यामुळें जो कांहीं परिणाम घडून आला असेल त्या परिणामाबाबत तें कृत्य करणाऱ्या इसमास जबाबदार धरता येणार नाहीं व त्यानें गुन्हा केला आहे, असेंही म्हणतां येणार नाहीं, असें क. ८८ मध्यें म्हटलें आहे. १२ वर्षांच्या आंतील मुलांच्या बाबतींत जें तत्त्व लागूं पडतें

तेंच तत्त्व १२ वर्षांच्या वरील मुलांच्या बाबतींतही लागूं पडतें. १२ वर्षांच्या वरील मुलगा शाळेत जात असेल तर स्वतःचें गैरवर्तन अथवा बेशिस्तपणाबद्दल स्वतःस योग्य ती शिक्षा देण्याचा अधिकार व संमति त्यानें आपल्या शिक्षकाला दिली होती, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाही. पीनल कोडच्या दृष्टीनें १२ वर्षांच्या वरील मुलगा तशी संमती देऊं शकतो.

प्रांतांतील शाळाखात्यानें जीं पत्रके काढली आहेत त्यांतील एका पत्रकान्वयें जो विद्यार्थी गंभीर स्वरुपाचा व वारंवार गैरवर्तन करील त्यांस त्याबाबत शारीरिक शिक्षा देण्याचा अधिकार शाळेच्या हेडमास्तरला देण्यांत आला आहे. शारीरिक शिक्षा द्यावयाची असेल तर त्याबाबतची लेखी कारणें हेड मास्तरनें नमूद केली पाहिजेत व शिक्षा देतांना अगदी बारीक छडीनें मुलाच्या तळहातावर मारले पाहिजे, असे देखील त्या पत्रकांत म्हटलें आहे. ह्या पत्रकावरून देखील असेंच दिसून येईल कीं, विद्यार्थ्यांना शारीरिक शिक्षा देणें काहीं वेळां अत्यंत गरजेचे असते, ही गोष्ट शाळाखात्यासही मान्य आहे.

शाळेची शिस्त कायम रहावी व गैरवर्तनाबद्दल योग्य शासन द्यावें य सद्भावनेने सितारामनें पुंडारामला छड्या मारल्या हें अगदीं निर्विवाद आहे. पुंडारामचें वर्तन सुधारावे हा देखील त्याला छड्या मारण्यांत सितारामचा उद्देश होता. ह्याचा अर्थ असा कीं, पुंडारामच्या हितासाठीच सितारामनें त्याला छड्या मारल्या.

वरील विवेचनावरून असें दिसून येईल कीं, सितारामने कोणताही गुन्हा केला नाहीं म्हणून त्याला दोषी ठरविता येत नाहीं. या बाबतीत सरकार वि. घाटगे ५१ मुंबई लॉ रिपोर्टर, पान १०३ हा कज्जा बघण्यासारखा आहे. त्या कज्जामध्यें देखील असाच प्रकार झाला होता. व हेडमास्तरला छड्या मारल्याबद्दल खालच्या कोर्टानें दंडाची शिक्षा दिली होती. पण मुंबई हायकोर्टानें खालच्या कोर्टाचा निकाल फिरवून हेडमास्तरला निर्दोषी ठरविलें.

## सबब

सबब आम्ही असा हुकूम करतो कीं, हा तपासणी अर्ज मंजूर करण्यांत येऊन सितारामला निर्दोषी म्हणून सोडून देण्यात येत आहे. त्याच्या कडून जर कांहीं दंड वसूल केला असेल तर तो दंड त्यास परत देण्यांत यावा.

# २२

# घराचा ताबा व भाडे ह्याबद्दल दावा.

## भयाराम वि. रमाबाई.

न्यायपंचायत कायदा... कलम ८६ व १०१... घराच्या कबजाबद्दल दावा... सदरहु दाव्यांत घरभाड्याची मागणी. प्रतिवादीनें वादीची मालकी नाकबूल केली व घर स्वतःचे असल्याबद्दल कैफीयत माडली. घरमालक व भाडेकरू यांच्या संबधाबद्दल न्यायपंचायतीच्या कोर्टात बराच उहापोह. ... न्यायपंचायतीनें वादीला घरभाड्याबद्दल १०० रुपयाच्या आंतील हुकूमनामा दिला. ... न्यायपंचायत कायद्याप्रमाणें हा हुकूमनामा योग्य समजला जाईल काय ?

एक होती बाई. तिचें नांव रमाबाई तिनें न्यायपंचायतीच्या कोर्टात भयारामवर घराच्या ताब्याबद्दल व भाड्याबद्दल दावा लावला. वादांतील घर आपल्या मालकीचें आहे व भयाराम आपला भाडेकरी आहे असें तिचें म्हणणें होतें.

भयाराम कोर्टात हजर झाला. व त्यानें आपलें लांबलचक म्हणणें हजर केलें. आपल्या लेखी कैफीयतीमध्यें त्यानें असें म्हटलें कीं...

"ज्या जागेवर वादांतील घर आहे ती जागा आपण रमाबाईचे आईपासून खरेदी घेतली असून त्या जागेवर आपणं स्वतः घर बांधलें आहे व त्यामुळें घराचे

मालक आपण आहों. अशा परिस्थितींत रमाबाईला घरभाडें व घराचा ताबा मागण्याचा कांहींच अधिकार नाहीं."

न्यायपंचायतीच्या कोर्टांत दावा सुरू झाल्यानंतर उभय बाजूतर्फे बराच पुरावा घेण्यांत आला. या पुराव्यामध्यें घरमालक व भाडेकरी याच्या संबंधाबद्दल बराच उहापोह करण्यांत आला. भयारामतर्फे जो पुरावा आला त्यामध्यें भाडेकरूंची बाजू मांडण्यांत आली व रमाबाईतर्फे जो पुरावा मांडण्यांत आला त्यामध्यें घरमालकाची बाजू मांडण्यांत आली.

भयारामचे म्हणणें थोडक्यांत असें होतें कीं,

"आजपर्यंत निम्मा जन्म मी भाडेकरू म्हणून राहिलों आहे. दारू पिऊन धुंद व्हावें त्याप्रमाणें पैशाचे लोभानें मदांध झालेल्या घरमालकाच्या लीला पाहून मी सर्द होऊन गेलो. मी एका घरांत राहात होतों. माझी बायको नुकतीच बाळंतीण झाली होती. त्या दिवशीं घरमालकाकडून घर खालीं करण्याबद्दल नोटीस आली. मी मनांत चरफडलो, चरफडलो आणि शेवटीं 'सात जन्मीं पाप करावें आणि भाडेकरूचें जन्माला यावें' असें स्वतःशीं पुटपुटत सर्व गैरसोयींनीं सुसज्ज अशा एका दुसऱ्या जागेंत राहूं लागलो···आजपर्यंत मला कितीतरी जागा बदलाव्या लागल्या. पुष्कळदां जागा आहे पण सोय नाहीं, घर आहे पण दार नाहीं, अशा ठिकाणीं मला रहावें लागलें. लग्नाचें वय होऊन गेलेला पण लग्न न झालेला वर ज्या उत्कंठेनें "वर पाहिजे" च्या जाहिराती वाचतो त्याच उत्कंठेनें "जागा भाड्यानें देणें आहे" या पाट्या मी पहात असे. भाडेकरूच्या जन्माला कंटाळून शेवटीं वादीच्या आईकडून मी एक मोकळी जागा विकत घेतली व त्यावर स्वतःचे घर बांधलें. मला आतां आशा वाटत होती कीं, आतातरी जन्मभर मला कोणी भाडेकरी म्हणून म्हणणार नाहीं व घरांतून जा म्हणणार नाहीं, पण ही आशा देखील खोटी ठरली आणि माझ्यावर पुन्हा भाडेकरी म्हणून दावा लावण्यांत आला."

रमाबाईतर्फे असें म्हणण्यांत आलें कीं...

"जगांत जास्तींत जास्त दुःखी जीवन जर कोणाचे असेल तर तें घरमालकाचें. घरमालकांना भाडेकरी जितका त्रास देतात तितका त्रास कुणालाही सोसावा

लागत नाहीं. भाडेकरूवर दावा केला तर कोर्टांतून कबजा मिळण्यास कमति कमी तीन चार वर्षे लागतात. मुदत संपल्यानंतर कोर्टांत कशाला जावयास पाहिजे अशा विचारानें घरमालकानें भाडेकरूचें सामान बाहेर काढलें तर लगेच भाडेकरू मालकावर फौजदारी फिर्याद करतो आपलें कृत्य म्हणजे फौजदारी गुन्हा आहे हें समजल्यावर मालकाची पळतां भुई थोडी होते. फौजदारी कोर्टात शिक्षा होण्यापेक्षां भाडे बुडाले तरी चालेल असा विचार करून तो भाडेकरूकडे जातो व त्याची सपशेल माफी मागतो. असले प्रकार पाहिले व हल्लींचे कायदे पाहिलें म्हणजे 'असेल त्याची जमीन व राहील त्याचें घर' ही म्हण घर मालकाच्या अनुभवाला येते."

पंचायत कोर्टानें दोन्ही बाजूचे म्हणणें ऐकले, दोन्ही बाजूंचा पुरावा घेतला व असा निकाल दिला कीं, भया रामतर्फे जो पुरावा दाखल करण्यांत आला आहे तो अजिबात विश्वसनीय नाही. रमाबाईतर्फे घेण्यांत आलेला पुरावा ग्राह्य मानून पंचायत कोर्टानें तिला घरभाड्याप्रित्यर्थ साठ रुपयांचा हुकूमनामा दिला. घराचे कबजाबद्दल मात्र हुकूमनामा करण्यांत आला नाहीं.

या निकालावर भयारामतर्फे वरच्या कोर्टात तपासणी अर्ज करण्यांत आला. वरच्या कोर्टानें आपल्या निकालपत्रांत म्हटलें कीं......

"खालच्या कोर्टाने घेतलेल्या पुराव्यापैकीं बराचसा पुरावा गैरलागू आहे. घरमालक व भाडेकरू यांच्या संबंधाबद्दल खालच्या कोर्टात बराच उहापोह झाला. पण तो उहापोह प्रस्तुतच्या खटल्यांत गैरलागू आहे. या कामी कायद्याचा एक महत्वाचा मुद्दा उपस्थित होतो. व त्याकडेच खालच्या कोर्टानें लक्ष देणें अवश्य होते. घराचें भाडे व ताबा अशा दोन मागण्या रमाबाईनें आपल्या फिर्याद अर्जात केल्या आहेत.

घराचें भाडें अगर कबजा संबंधींचे दावे न्यायपंचायतीसमोर चालूं शकत नाहींत. ज्या कराराच्या स्थावर मिळकतीशीं संबंध नाहीं अशा कराराचा भंग झाला असेल तर करारभगाप्रित्यर्थ नुकसानभरपाईसाठी लावण्यांत आलेला शंभर रुपयापर्यंतचा दावा न्यायपंचायतिसमोर चालूं शकतो. न्यायपंचायतीनें रमाबाईला

दिलेला हुकूमनामा शंभर रुपयाच्या आंतील आहे व तो घरभाड्याबद्दल नुकसान भरपाईसंबंधींचा आहे असें जरी आपण गृहीत धरलें, तरी त्या नुकसान भरपाईचा संबंध स्थावर मिळकतीशीं येत असल्यामुळें न्यायपंचायतीला या बाबतींत निकाल करण्याचा अधिकार नाहीं. ज्या बाबतींत अधिकार नाहीं त्या बाबतींत न्याय पंचायतीनें निकाल केला असल्यानें तो निकाल रद्द व निरर्थक आहे असें ठरवावें लागेल.

सबब

आम्ही असा हुकूम करतो कीं, खालच्या कोर्टानें दिलेला निकाल रद्द करण्यांत येत आहे, मात्र योग्य त्या दिवाणी कोर्टातून आवश्यक ती दाद मागण्याचा अधिकार रमाबाईला राहील असें आम्ही जाहीर करतो.

# २३

# पिकाचें नुकसान

बापलेकांचें भांडण... इं. पी. को. क. ४२६.. पिकांची खराबी.. मुलानें बापाशी कसें वागावें... पण कायदा काय म्हणतो ?

बापलेकांमध्यें भांडण होणें म्हणजे कांहीं विशिष्ट गोष्ट आहे असें मानलें जात नाहीं. पण हें भांडण जेव्हां कोर्टामध्यें येतें तेव्हां मात्र त्यांत कांहींतरी विशेष आहे असें लोक मानतात.

बाबू व त्यांचा मुलगा बाळू ह्यांच्या बाबतींत असाच प्रकार झाला. हे वरचेवर भांडत असत. व शेवटीं ते आपल्या खेडेगांवांत दोन घरें करून विभक्त राहूं लागले तरी देखील लोकांना त्याबद्दल विशेष कांहीं वाटलें नाहीं. जेव्हां ह्या बापलेकांचे भांडण न्यायपंचायतीच्या कोर्टांत आलें, तेव्हां मात्र कांहींतरी विशेष झाल्याप्रमाणें लोक त्या गोष्टीकडे पाहूं लागले.

बाबू व बाळू ह्यांनीं आपली जमीन वांटून घेतली होती, त्यांच्या जमिनी शेजारीं दुसऱ्या एका मालकाची जमीन होती. पण तो मालक बरेच दिवस कोठें निघून गेला असल्यामुळें ती जमीन विकत घ्यावी असें बाबू व बाळू ह्या दोघांनाही वाटत होतें. बाळू तर मनांत म्हणत होता कीं मालक गांवी आल्यानंतर आपल्या

बापापेक्षां जास्ती किंमत देऊन आपणच ती जमीन विकत घेणार. मालक लवकर गांवीं येत नाहीं व जमीन उगीच पड पडली हें पाहून बाबूनें त्या जमीनींत जोंधळा पेरला. कांहीं दिवसांनीं जोंधळ्याचें पीक थोडेसें वर आलें. बाबूला मोठा आनंद झाला—

बाळूला मात्र वाईट वाटूं लागलें. आपल्या बापाला फुकट पीक मिळावें ही गोष्ट त्याला सहन झाली नाहीं. त्यानें एके दिवशीं जबरदस्तीनें आपलीं गुरें त्या पिकांत घुसवली व त्या पिकाची नासाडी केली.

आपल्याच मुलानें ह्या प्रकार केला हें पाहून बाबू संतापला. त्याला कांहीं मित्रांनीं सल्ला दिला व त्याप्रमाणें त्यानें न्यायपंचायतीच्या कोर्टात इंडियन पीनल कोड, कलम ४२६ प्रमाणें फिर्याद दाखल केली.

बाळूतर्फे जो पुरावा झाला त्यांत हें निष्पन्न झालें कीं, बाळूनें सुमारें ४० रुपयाचें नुकसान केलें आहे. आपल्या गांवच्या एका मुलानें आपल्या बापाचें अशातऱ्हेनें नुकसान करावें ही गोष्ट न्यायपंचायतीच्या सभासदांना आवडली नाहीं. मुलांनीं आपल्या बापाबरोबर कसें वागावें वगैरेबद्दल न्यायपंचायतीनें आपल्या ठरावांत बराच उहापोह केला व शेवटीं असें म्हटलें कीं, बाळूचें हें कृत्य निंद्य असल्यामुळें व ४२६ कलमाखालीं तो गुन्हेगार ठरत असल्यामुळें त्याला आम्ही ४० रुपये दंडाची शिक्षा देतों.

ह्या निकालाविरुद्ध बाळूनें ८३ कलमाप्रमाणें वरच्या कोर्टात तपासणी अर्ज केला. वरच्या कोर्टानें निकाल दिला तो असा...

खालच्या कोर्टानें मुलानें बापाशीं कसें वागावें वगैरेबद्दल बराच उहापोह केला आहे; परंतु कोर्टानें जो निकाल करावयाचा असतो तो कायद्याला धरून करावयाचा असतो. इंडियन पीनल कोड, कलम ४२६ मध्यें असें म्हटलें आहे कीं, जो कोणी उपद्रव, नुकसान अगर नासाडी करील त्याला कैदेची अगर दंडाची शिक्षा देतां येईल. अन्याय नुकसानीबद्दलचे हें कलम आहे. ह्या बाबतींत नुकसान कोणाचें हा प्रश्न अत्यंत महत्वाचा आहे. ज्या जमिनींत बाळूनें पीक केलें होतें ती त्याची स्वतःची जमीन नव्हती. अशा स्थितींत बाळूनें जें कृत्य केलें त्यामुळें कायद्याप्रमाणें तो ४२६ कलमाखालीं गुन्हेगार ठरत नाहीं.

त्या बाबतींत मद्रास हायकोर्टानें एक अत्यंत महत्वाचा निवाडा दिला आहे. वैयापुरी वि. कुप्पुस्वामी ( १९४८ ऑल इंडिया रिपोर्टर मद्रास पान ४७३ ). मद्रास हायकोर्टानें जो कज्जा निर्णित केला त्या कज्ज्यांतील हकीगत व प्रस्तुत कज्ज्यांतील हकीगत ह्यांत बरेंच साम्य आहे. फरक इतकाच कीं, मद्रासच्या कज्ज्यांत पन्नास रुपयांपेक्षां जास्त नुकसानी झाली होती म्हणून इंडियन पीनल कोड, कलम ४२७ लागूं केलें होतें. प्रस्तुत कज्ज्यांत पन्नास रुपयांच्या आंत नुकसानी असल्यामुळें ४२६ कलम लागूं केलें आहे.

मद्रास हायकोर्टानें निर्णित केलेल्या कज्ज्याचा सारांश थोडक्यांत असा आहे...

एका शेताचा एक तुकडा पडीत पडला होता. शेताचा मालक त्या तुकड्याची उस्तवारीही करीत नसे. व त्या तुकड्यांत बी वगैरेही पेरीत नसे. वैयापुरी व कुप्पुस्वामी ह्या दोघांनाहीं तो तुकडा विकत घ्यावयाचा होता, सौदा लवकर पक्का होईना म्हणून वैयापुरी व कुप्पुस्वामी हे दोघेही मधून मधून आपापल्या परीनें त्या जमिनीच्या तुकड्याचा उपयोग करीत असत. प्रकरण एवढ्यावरच थांबले नाहीं. सौदा पक्का होऊन मालकी प्राप्त होण्यापूर्वीच कुप्पुस्वामीनें त्या तुकड्यांत बींही पेरलें. बी रुजलें व पीक उगवलें. वैयापुरी हा कुप्पुस्वामीचा प्रतिस्पर्धी होता. कुप्पुस्वामीला पीक मिळावें ही गोष्ट वैयापुरीला सहन झाली नाहीं. सबब वैयापुरीनें आपलीं गुरें त्या शेतांत जबरदस्तीनें चरावयास पाठविली. गुरांनीं सर्व शेत उध्वस्त करून पिकाचीं नासाडी केली. त्या नुकसानीबाबत कुप्पुस्वामीनें वैयापुरीवर पीनल कोडच्या क. ४२७ अन्वयें खटला भरला. अव्वल कोर्टानें वैयापुरीला त्या कलमान्वयें दोषी ठरवून ३० रुपये दंडाची शिक्षा दिली. त्या शिक्षेवर वैयापुरीनें हा तपासणी अर्ज केला होता.

वैयापुरीला कलम ४२७ अन्वयें दोषी ठरवितां येतें किंवा नाहीं, हे आपल्याला पहावयाचें आहे. उपद्रव, नासाडी व नुकसान करणें हा पीनल कोडअन्वयें गुन्हा आहे व झालेल्या नुकसानीची किंमत ५० रुपयाहून अधिक असेल तर नुकसानीस जबाबदार असणाऱ्या इसमास क. ४२७ अन्वयें दोषी ठरवितां येतें.

त्या विषयीं वाद नाहीं. परंतु समाजाच्या अथवा समाजांतील एखाद्या विशिष्ट इसमाच्या मालकीच्या मालमत्तेला अन्यायरीतीनें नुकसान पोचावें या उद्देशानें जर आरोपीनें नुकसान पोचविलें असेल तरच त्यास क. ४२७ अन्वयें दोषी ठरवितां येतें, अन्यथा नाहीं. "अन्याय नुकसानी" ह्या शब्दाची व्याख्या पीनल कोडच्या क. २३ मध्यें दिलेली आहे. "मालमत्ता ज्याच्या मालकीची आहे त्या इसमास नुकसान पोंचावें ह्या उद्देशानें अन्याय मार्गानें केलेली नुकसानी" अशी ती व्याख्या आहे.

वैयापुरीचीं गुरें शेतांत शिरलीं व त्यानीं पिकाचें अन्याय्यरितीनें नुकसान केलें हें जरी खरें असलें. तरी त्या जमीनीच्या मालकास अन्याय्यरितीनें नुकसान पोंचविण्याच्या उद्देशानें वैयापुरीनें आपली गुरें शेतांत पाठविलीं असें म्हणतां येत नाहीं, कारण कीं, ज्या शेतांतील पिकाचें नुकसान वैयापुरीच्या गुरानीं केलें आहे त्या शेतावर कुप्पुस्वामीचा मालक अथवा इतर कोणत्याही नात्यानें मुळींच हक्क नव्हता. सबब मालकास नुकसान पोंचविण्याच्या उद्देशानें वैयापुरीनें अन्याय-रितीनें नुकसान पोंचविलें असें म्हणतां येत नाहीं व म्हणून क. ४२७ लागूं पडण्यासाठीं आरोपीचा जो आवश्यक उद्देश असावा लागतो त्या उद्देशाने वैया पुरीनें नुकसान पोंचविलें असें म्हणतां येत नसल्यामुळें त्यांस क. ४२७ अन्वये दोषी ठरवितां येत नाहीं.

सबब आम्ही हें रिव्हीजन मंजूर करून वैयापुरीला निर्दोषी ठरवून सोडून देतों.

हा निकाल व त्याचें तत्व पाहिलें म्हणजे असेंच म्हणावें लागेल कीं, बाळूचें कृत्य ४२६ कलमाखालीं येत नसल्यामुळें त्याला निर्दोषी म्हणून सोडून दिलें पाहिजे.

सबब

आम्ही असा हुकूम करतों कीं, हा तपासणी अर्ज मंजूर करण्यांत येऊन आरोपी बाळूला निर्दोषी म्हणून सोडून देण्यांत येत आहे.

# २४

# आपल्या जनावराबद्दल योग्य दक्षता न घेणें.

**नंजाप्पा वि. धोंडाप्पा,**

मारकी गाय. . गायरान. . भर बाजारांत मारकी गाय सोडणें. . इं. पी. को. क. २८९...न्यायपंचायतीपुढें एक मजेशीर कज्जा सुरू होता. . त्याची हकीकत अशी होती...

पुरण नांवाच्या गांवांत धोंडाप्पा नांवाचा एक गृहस्थ राहात होता. एक विद्वान पण भांडखोर पुढारी अशी त्याची ख्याति होती. त्यानें एकदां असा बूट काढला कीं, आपल्या खेडेगांवांत जनावरांना चरण्याकरितां कांहीं जमीन मोकळी ठेवावी व त्यासाठीं गांवांतील लोकांनीं थोडासा स्वार्थत्याग करून ही योजना मंजूर करावी.

धोंडाप्पाची योजना चांगली होती. पण लोकांना वाटलें कीं, या योजनेमध्ये धोंडाप्पाचा कांहीं तरी स्वार्थ आहे. धोंडाप्पाच्या तोंडावर कोणी तसे बोलले नाहीं पण त्याची योजना मात्र गांवांतील लोकांनीं नामंजूर केली.

आपली योजना नामंजूर ठरल्याबरोबर धोंडाप्पा चिडला, संतापला व त्यानें मनाशीं असें ठरविलें कीं, लोकांना कांहींतरी त्रास दिला पाहिजे म्हणजे सर्व कांहीं ठीक होईल.

त्याच्या घरीं एक मारकी गाय होती. बाजाराच्या दिवशीं तो तिला खुशाल मोकळी सोडूं लागला.

धोंडाप्पाच्या गाईनें बाजारांत दोन तीन खेपेस बराच धूमाकूळ घातला. कांहीं लोकांनीं त्याबद्दल धोंडाप्पाला विचारलें पण तो आपल्याच गुर्मीत होता. चौथ्या खेपेस धोंडाप्पानें आपली मारकी गाय पुन्हां भर बाजारांत सोडली. एका ठिकाणीं दोन भिकाऱ्यांची लहान पोरें भिक्षा मागत होतीं. मुलीचा फाटका परकर, ठिगळाचा मेणचटलेला पोलका, कितीतरी दिवसांत न विंचरल्यामुळें डोक्यावर बसलेल्या केसांच्या जटा आणि हातांत एक फुटकी वाटी. मुलीजवळच असणाऱ्या लहान मुलानें लंगोटी आणि फाटका सदरा घातला होता. त्याचे केस बोटबोटभर लांब वाढले होते. व सर्व अंग अगदीं काळे दिसत होतें. तीं दोन पोरें म्हणजे मूर्तिमंत दारिद्र्याचें प्रदर्शन होतें. आपल्या गोड आवाजांत तीं म्हणत होतें......

"दुनियाऽऽमें गरीबोंको।
आराऽऽम नहीं मिलता॥
आराऽऽम नहीं मिलता॥"

धोंडाप्पानें सोडलेल्या गाईनें पळतां पळतां त्या गरीब बिचाऱ्या दोन मुलांना शिंगानें मारलें. ती गरीब बिचारी मुलें रडूं लागलीं. जवळचें कांहीं लोक म्हणाले "गाय देव आहे. असें चालायचेच !"

बाजरांत दुसऱ्या एका टोंकाला कांहीं स्वयंसेवक गाणें गात हिंडत होते ते म्हणत होते......

"गांधिबाबाचं हेऽऽऽआलं राज॥ धृ॥
सावकाराची लटपट, गेली दामदुप्पट;
नाहि मुद्दलाला पत्ता तिथं कुठलं व्याज ?॥
ग्रामपंचायतीला, पंधरा टक्के दिला।
चावडीमदला बसून झालं गावाचं काज॥
गांधिबाबाचं हेऽऽआलं राज॥

धोंडाप्पाच्या गाईनें स्वयंसेवकापैकीं एकाला मारल्याबरोबर सगळ्या स्वयंसेवकांनीं त्या गाईला बेदम मार दिला. मार खाल्लयानंतर ती गाय लांब दुसरीकडे पळून गेली. वाटेंत नंजाप्पा उभा होता. तो पुढें गेला व गाईला अडवूं लागला पण त्या मारक्या गाईनें त्यालाच एक जोराची ढुशी देऊन त्याचा एक दांत पाडला. त्याला वाटलें...भरबाजारांत गाईनें धुमाकूळ घालणें बरें नव्हे.

ह्या प्रकाराच्या दुसऱ्याच दिवशीं नंजाप्पानें धोंडाप्पावर न्यायपंचायतीच्या कोर्टांत फिर्याद दाखल केली. सर्व पुरावा झाल्यावर न्यायपंचायतीनें निकाल दिला तो असा...

"इंडियन पीनल कोड, कलम २८९ मध्यें असें म्हटलें आहे कीं, जो कोणी जाणून बुजून अथवा हयगयीनें आपल्या ताब्यांत असलेल्या जनावराबद्दल योग्य ती काळजी घेणार नाहीं व मानवी जीवितास अपाय होण्याबद्दल विरूद्ध योग्य ती दक्षता घेणार नाहीं त्याला सहा महिनेपर्यंत कैदेची शिक्षा होईल. पंचायत कायद्याच्या कलम ६८ ला शेवटीं. जें एक परिशिष्ट जोडण्यांत आलें आहे. त्यामध्यें अशा तऱ्हेचा गुन्हा चालविण्याचा अधिकार न्यायपंचायतीस दिला आहे. या कज्जांत जो पुरावा झाला त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, धोंडाप्पानें २८९ कलमाप्रमाणें गुन्हा केला आहे.

धोंडप्पातर्फे असें सांगण्यांत आलें आहे कीं, आपल्या पुर्वजांनीं गायरानाबद्दल जे नियम केलें होते तें फार चांगलें होते व तसेच नियम आपण केले पाहिजेत. धोंडाप्पाचें म्हणणें मान्य करूनही त्यानें केलेलें कृत्य क्षम्य आहे असें आम्हांला वाटत नाहीं. सर्व पुरावा विचारांत घेऊन आम्ही असें फर्मावितो कीं, धोंडाप्पा हा इंडियन पीनल कोड, कलम २८९ दोषी आहे व त्याला ह्या गुन्ह्याबद्दल २५ रुपये दंडाची शिक्षा केली पाहिजे.

आपल्या सारख्या पुढाऱ्याला न्यायपंचायतीनें केलेली दंडाची शिक्षा पाहून धोंडाप्पा फारच चिडला. न्यायपंचायतीच्या कलम ८३ प्रमाणें हें काम वरच्या कोर्टांत गेल्यानंतर धोंडाप्पातर्फे खूपच मोठ्या तक्रारी करण्यांत आल्या. त्या सर्व तक्रारींचा विचार करून वरच्या कोर्टानें निकाल दिला तो असा......

"धोंडाप्पातर्फे गायरानाबद्दल बरीच माहिती सांगण्यांत आली. ती माहिती आजच्या काळीं देखील फारच उपयुक्त आहे याबद्दल काडीमात्र वाद नाहीं.

याज्ञवल्क्यानें असें म्हटले आहे कीं... प्रत्येक खेड्यांत खेडुतांच्या संमतीनें किंवा राजाज्ञेनें गायरानें म्हणून निराळी भूमि ठेवलेली असावी.

ग्रामेच्छया गो-प्रचारो भूमी राजवशेनवा।

आमच्या स्मृतिकारांनीं गायरानासारख्या महत्त्वाच्या विषयावर बराच विचार केलेला दिसतो. व त्यांचे विचार आजच्या ग्रामोद्धाराच्या काळांत आपणांस बरेच मार्गदर्शक होण्यासारखे आहेत. गांवातील लोकांनीं गायरान म्हणून गुरें चारण्याकरितां एकमतानें कांहीं जमीन जर वेगळी ठेवली नसेल, त्याबद्दल गांवातील लोकांचें जर एक मत होत नसेल, तर राजानें मध्यें पडून सर्व लोकांना आपलीं गुरें मोफत चारण्यांकरितां गायरानाबद्दल जरूर ती व्यवस्था करावी. असा त्यावेळीं नियम होता. गायरान म्हणून किती जमीन वेगळीं ठेवावी ह्याबदलही स्मृतिग्रंथांतून आपणांस नियम आढळतात. एखादें खेडें व त्याच्या भोंवतालची पेराऊ शेतें ह्यांचे दरम्यान चारशें हात जागा गुरांना चारण्याकरितां ठेवण्यांत यावी. मोठ्या खेड्यामध्यें ही जागा आठशें हात असावी व शहरामध्यें ही जागा शहराभोंवती सोळाशें हात असावी असा त्यावेळीं दंडक होता.

धनुःशतं परीणा हो ग्रामक्षेत्रान्तरं भवेत्।

द्वेशते सर्वटस्य स्यात् नगरस्यचतुः शतम्। (याज्ञवल्क्य)

आपल्या प्राचीन स्मृती पाहिल्या म्हणजे असें दिसतें कीं, प्रत्येक खेडेगांवाभोंवती कंबरपट्ट्याप्रमाणें गुरांना चारण्याकरितां ४०० हात रूंदीचे गायरान असावें असा त्यावेळीं नियम उत्तम आहे ह्याबद्दल थोडा देखील वाद नाहीं. प्रश्न असा कीं... एखादा उत्तम नियम एखाद्या माणसानें दुसऱ्या लोकांना सांगितला व दुसऱ्या लोकांनीं तो मानला नाहीं तर नियम सांगणाऱ्या माणसाला दुसऱ्यांना त्रास देण्याचा अधिकार आहे काय? धोंडाप्पातर्फे असें सांगण्यांत येत आहे कीं, अशावेळीं दुसऱ्यांना त्रास देण्याचा अधिकार आपल्याला आहे. धोंडाप्पाचें हें म्हणणें सर्वथैव चूक आहे.

"शठंप्रति शाठ्यं" अशा तऱ्हेचा समर्थांचा उपदेश आपल्या मनावर बिंबल्यामुळें आपण आपली मारकी गाय भरबाजारांत सोडून आपण लोकांना त्रास देऊं लागलो असें धोंडाप्पातर्फे सांगण्यांत येत आहे. आपण स्वतः वाईट कृत्य करून आधार म्हणून एखाद्या संतांचें वचन घेऊन आपल्या कृत्यावर मुलामा फासण्याचा प्रयत्न धोंडाप्पा करीत आहे. अशा तऱ्हेच्या त्याच्या प्रयत्नाला काय-द्यामध्यें काडीची किंमत नाहीं. "शठंप्रती शाठ्यं" अशा तऱ्हेचें कृत्य धोंडाप्पाचें खास नाहीं. आपण असले कृत्य करण्यापूर्वी त्यानें समर्थांचेच खालील उद्‌गार लक्ष्यांत ठेवणें जरूर होतें.

"आपणांस चिमोटा घेतला। तेणें जीव कासावीस झाला॥
आपणावरून दुसऱ्याला। ओळखीत जावें॥

समर्थ.

खालच्या कोर्टानें २८९ कलमचा उहापोह केला आहे तो योग्य आहे. धोंडाप्पाचें कृत्य त्या कलमाखालीं येतें. ह्यांत काडीमात्र शंका नाहीं. खालच्या कोर्टानें धोंडाप्पाला २५ रुपये दंड केला आहे. धोंडाप्पाचें कृत्य इतकें वाईट आहे कीं, त्याला ह्यापेक्षां अधिक जरी दंड केला असता तरी तें क्षम्य ठरलें असतें. सबब धोंडाप्पाचा फेरतपासणीचा अर्ज फेटळून लावण्यांत येत आहे.

*

# २५

# समान हक्क कीं सवाई हक्क

**विलासपूर—**

प्रिय माधव यास, तुझें पत्र पोचलें. "समान हक्क कीं सवाई हक्क" य विषयावर मी एक चुरचुरीत व झणझणीत लेख लिहिणार आहें. मला तर आतां वाटूं लागलें आहे कीं, बायकांनीं गोडगोड बोलून पुरुषांच्या डोक्यावर मिरी वाटण्यास आरंभ केला. भारताच्या घटनेनें स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें समान हक्क दिला आहे, पण स्त्रिया एवढ्यावर खुष दिसत नाहींत. त्यांना केवळ समान हक्क नको असून सवाई हक्क पाहिजे आहे. पुरुषांना जे हक्क आहेत ते बायकांना पाहिजेतच; पण शिवाय बायकांना म्हणे 'बायका' म्हणून विशिष्ट हक्क पाहिजेत. बायकांची हक्काची भाषा ऐकून मला पुष्कळदां आगगाडीची आठवण होते. आगगाडीमध्यें बायकांना वाटेल त्या पुरुषांच्या डब्यांत बसतां येतेंच पण शिवाय बायकांचा म्हणून एक निराळा डबा असतोच. या डब्यांत मात्र कोणाहि पुरुषाला बसण्याला मनाई असते! समान हक्काच्या चष्म्यांतून पाहिलें म्हणजे हा प्रकार चमत्कारिक नाहीं कां? असाच चमत्कारिक प्रकार बायकांना कायद्याच्या प्रांतांतदेखील पाहिजे आहे. कायद्याच्या प्रांतांत बायकांना पुरुषांच्या बरोबरीनें हक्क पाहिजेतच; पण शिवाय त्यांना बायका म्हणून विशिष्ट अधिकार

पाहिजेत. मिळवता पुरुष असला तर त्याच्या बायकोला म्हणे वेगळे राहून देखील नवऱ्यानें पोटगी दिली पाहिजे. समान हक्काच्या या काळांत हाच नियम पुरुषांच्या बाबतींत कां लागूं नये? एखादी बायको मिळवती असली तर तिच्या नवऱ्याला बायकोच्या मिळकतींत पोटगीचा अधिकार कां असूं नये? पण हल्लींचा कायदा मात्र इतका पक्षपाती आहे कीं, तो बायकांचेच वाटेल तितके चोचले पुरवायला तयार आहे. पण—जाऊं दे.

मला कोणी सांगितलें कीं, मुंबई हायकोर्टानें देखील नुकताच एक कज्जा निर्णित केला आहे व त्यामध्यें पीनल कोडच्या कलम ४९७ कलमाचा विचार करून बायकांना विशिष्ठ अधिकार दिला आहे. मुंबई हायकोर्टाच्या निर्णयावर आमच्या गांवीं खूप उलटसुलट चर्चा झाली. मला मुंबई हायकोर्टाचे विचार अजिबांत पसंत नाहींत. बराच मालमसाला ठासून नि ठिच्चून भरलेला असा एक दणकेबाज धडाकेबाज लेख मी लवकरच लिहिणार आहें. लेख प्रसिद्ध झाल्यावर तुला कळेल कीं, बायकांच्या मागण्यांना वेळींच पायबंद घातला नाहीं तर पुरुषांच्या नाकींनऊ येईल.

तुझ्या उत्तराची वाट पाहाणारा,

तुझा,

मुकुंद.

* * *

प्रिय मुकुंद

तुझे पत्र पोंचलें. पत्र वाचून माझी व सौभाग्यवतीची खूप करमणूक झाली. पत्र पाठविण्यापूर्वी तूं वहिनींना तें दाखविलें होतेंस कां? माझी तुला अशी मित्रत्वाची सूचना आहे कीं, तुझा लेख प्रसिद्ध करण्यापूर्वी तो वहिनींना जरूर दाखीव. तुझे विचार अगदीं एकांगी आहेत. भारतवर्षांत बायकांची स्थिती पुरुषांच्या मानानें कितीतरी शोचनीय आहे व ही शोचनीय स्थिती लक्षांत

घेऊनच कायद्यानें त्यांना कांहीं विशिष्ट अधिकार दिले आहेत. अशा परिस्थितींत त्यांच्याबद्दल सहानुभूति दाखविण्याच्या ऐवजीं तूं जो उलटा लेख लिहित आहेस, त्यामुळें त्यांच्या दुःखांवर डागण्या देण्यासारखें होणार नाहीं कां ?

तूं आपल्या पत्रांत मुंबई हायकोर्टाच्या निकालाचा उल्लेख केला आहेस. त्या निकालाबद्दल पुष्कळ ठिकाणीं बरीच भवती न भवति झाली, ही गोष्ट खरी आहे. पण तो निकाल तूं वाचलेला दिसत नाहींस. तुझ्या माहिती करितां त्या निकालाचा थोडक्यांत सारांश या खालीं देत आहे. त्या कज्जाचें नांव **युसुफ अबदुल अजीज वि० सरकार** ( १९५१ मुंबई लॉ रिपोर्ट, पान ७३६ ) असें आहे. या कज्जामध्यें मुंबई हायकोर्टानें जे म्हटलें आहे, तें थोडक्यांत असें—

एका बाईचा नवरा तुरुंगांत शिक्षा भोगीत असतांना ती बाई एकटीच आपल्या घरीं राहात होती. ती अशा प्रकारें एकटी राहात असतांना युसुफनें तिच्याशीं व्यभिचार केला. नवरा तुरुंगांतून सुटून आल्यानंतर त्याला हा प्रकार कळला. त्यानें व्यभिचाराबाबत पीनल कोडच्या कलम ४९७ अन्वयें युसुफवर खटला भरला. तो खटला चालू असतांना युसूफनें घटना कायद्याच्या आर्टिकल २२८ अन्वयें हायकोर्टांत एक अर्ज दिला. क. ४९७ घटनाबाह्य असल्यामुळें त्या कलमान्वयें आपल्यावर खटला चालूं शकत नाहीं, अशी मागणी त्यानें त्य अर्जांत मागितली होती.

युसूफचा अर्ज मंजूर करावा किंवा काय हें आपल्याला पाहावयाचें आहे. युसूफतर्फे असा युक्तिवाद करण्यांत आला आहे कीं, हिंदुस्तानच्या घटना कायद्याच्या आर्टिकल १४ नें सर्व नागरिकांना कायद्याच्या दृष्टीनें समानता व सारखें संरक्षण दिलें आहे. व कायदा सर्वांच्यासाठीं सारखाच राहील, असे त्या आर्टिकलमध्यें म्हटलें आहे. परंतु पीनल कोडच्या क. ४९७ मध्यें पुरुष व स्त्री असा भेदभाव करण्यांत आला आहे. कारण कीं, व्यभिचार करणारा पुरुष त्या कलमान्वयें शिक्षेस पात्र ठरविला आहे. हा भेदभाव आर्टिकल १४ अन्वयें दिलेल्या मूलभूत हक्कांशीं विसंगत असल्यामुळें तसा भेदभाव करणारें क. ४९७ रद्द ठरविलें पाहिजे. व म्हणून त्या कलमान्वयें कोणत्याहि पुरुषाल दोषी ठरवितां येत नाहीं.

हा युक्तिवाद आम्हांला पटत नाहीं. परस्त्रीशीं तिच्या नवऱ्याच्या संमतीशिवाय व्यभिचार करणें, हा क. ४९७ अन्वयें गुन्हा आहे. व्यभिचार करणाऱ्या पुरुषाला त्या कलमान्वयें दोषी ठरवितां येतें व स्त्रीला दोषी ठरवितां येत नाहीं, हें खरें आहे. परंतु तेवढ्यावरून त्या कलमांत पुरुष व स्त्री असा भेदभाव करण्यांत आला आहे, असें म्हणणें चुकीचें ठरेल. क. ४९७ मध्यें एक गुन्हा सांगितला आहे. जो इसम परस्त्रीशीं तिच्या नवऱ्याच्या संमतीशिवाय व्यभिचार करील, त्या इसमाच्या हातून तो गुन्हा घडत असतो. दुसऱ्या एखाद्या बाईच्या नवऱ्याशी एखाद्या स्त्रीनें व्यभिचार करणें हा गुन्हा आहे, असें त्या कलमांत म्हटलें नाहीं. कायदेमंडळानें तसा कायदा पास करण्यांत चूक केली आहे किंवा काय, हा प्रश्न अगदीं निराळा आहे. क. ४९७ नें एका विशिष्ट प्रकारचा म्हणजे पुरुषानें परस्त्रीशीं केलेला व्यभिचार शिक्षेस पात्र ठरविला आहे. तें कलम फक्त त्या प्रकारच्या व्यभिचारापुरतें मर्यादित आहे. स्त्रीनें परपुरुषाशीं केलेला व्यभिचार त्या कलमाच्या कक्षेंत येत नाहीं. क. ४९७ ची अंमलबजावणी करतांना व्यक्तिव्यक्तित भेदभाव केला जातो, असें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. स्त्रियांच्या बाबतींत तें कलम लागूंच पडत नाहीं. फक्त पुरुषांच्या बाबतींत तें लागूं पडतें. या कलमानें व्यक्तिव्यक्तींत भेदभाव केला नाहीं. कारण कीं, सर्व पुरुषांच्या बाबतींत तें कलम सारखेंच लागूं पडतें. पुरुष व स्त्री असा भेदभाव त्या कलमानें केला नाहीं. क. ४९७ नें पुरुषाला केवळ तो पुरुष आहे म्हणून शिक्षेस पात्र ठरविलें नाहीं व स्त्रीला केवळ ती स्त्री आहे म्हणून माफी दिलेली नाहीं. पीनल कोड ज्यावेळीं तयार करण्यांत आलें, त्यावेळीं हिंदुस्थानांतील स्त्रियांची परिस्थिती अत्यंत शोचनीय होती. मुलींचीं लग्नें अगदीं लहानपणीं होत असत व पुरुषहि अनेक मुलींशी लग्नें करीत. बायकांना स्वतंत्र अस्तित्व नव्हतें. त्यांची अवस्था गुलामासारखी होती. स्त्री ही पुरुषाच्या मालकीची वस्तु समजली जात असे. स्त्रियांची अंशता सोडवणूक करावी व त्यांना थोडेंसें संरक्षण मिळावें, ह्या हेतूनें क. ४९७ च्या कक्षेंतून स्त्रियांना हेतुपुरस्सर वगळलें आहे. हिंदुस्थानांतील स्त्री केवळ स्त्री आहे म्हणून तिला क. ४९७ च्या कक्षेंतून वगळण्यांत आलें नसून शोचनीय अवस्था विचारांत घेऊन व तिच्यावर दया दाखवावी म्हणून तिला

वगळण्यांत आलें आहे. अनेकदां व्यभिचाराच्या बाबतींत स्त्रियावर सक्ति होत असे. व्यभिचार सहन करा व शिक्षाहि भोगा, ह्या दुहेरी त्रासांतून स्त्रियांची सुटका व्हावी म्हणून त्यांना वगळण्यांत आलें आहे. स्त्रीली ती केवळ स्त्री आहे म्हणून वगळण्यांत आलें नसून तिची शोचनीय अवस्था विचारांत घेऊन व त्या अवस्थेतून तिची सोडवणूक करावी म्हणून तिला वगळण्यांत आलें आहे. हा उद्देश स्तुत्य आहे. पीनल कोड तयार झालें, त्या वेळची हिंदुस्थानांतील स्त्रियांची परिस्थिती विचारांत घेतां त्यांना तसें संरक्षण देणें गरजेचें होतें. सबब, क. ४९७ नें स्त्री व पुरुष असा भेदभाव केला आहे, असें म्हणतां येत नाहीं. स्त्रियांची आजची परिस्थिती पुष्कळच सुधारली आहे. ह्या गोष्टीशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं.

वरील कारणांस्तव आम्ही असें ठरवितों कीं, क. ४९७ हें घटना कायद्यांतील आर्टिकल १३ अन्वयें रद्द ठरत नाहीं. सबब, आम्ही हा अर्ज फेटाळून लावतो व युसूफवरील खटला पुढें चालावा असा हुकूम देतों.

*   *   *

तूं आपला लेख लिहिण्यापूर्वी वरील कज्जाची हकीकत नीट लक्षांत घे. नाहीतर एखादे वेळीं तूं चांगलाच गोत्यात येशील. तुला कदाचित् माहित नसेल कीं, हायकोर्टाच्या निकालावर भलतीसलती टीका केली तर कोर्टाची बेअदबी होते. कायदा माहित नसल्यामुळें तुला कदाचित् "झक मारली नि आपण ह्या फंदांत पडलों" असें म्हणण्याची पाळी येईल. अशा परिस्थितींत हायकोर्टावर टीका करण्याच्या भानगडींत न पडतां सारासार विचार करून तुला जें योग्य वाटेल तें लिही.

असो. विशेष काय लिहिणें ?

तुझा लेख वाचण्यास आतुर झालेला,

तुझा,

माधव.

# २६

## धर्मातीत राज्य व पक्षातीत न्याय

प्रश्नः—भारतवर्षाला स्वराज्य मिळून आतां आपल्या देशांत लोकशाहीचा राज्यकारभार सुरू झाला, याबद्दल कोणालाही पराकाष्ठेचा आनंद वाटेल. मला मात्र राहून राहून वाईट वाटतें कीं, माझ्या गावांतील कांहीं लोक स्वतःला कॉंग्रेसवाले म्हणवितात व उठल्या सुटल्या कोर्टाचें कामांत लुडबुड करितात. बिचारी कोर्टें देखील पुष्कळ वेळा त्यांना भिवून त्यांच्या प्रमाणें निकाल देतात. एकाद्या न्यायाधीशानें एकाद्या कॉंग्रेसवाल्याविरुद्ध आपल्या ठरावांत कांहीं लिहिलें तर लगेच हे लोक हायकोर्टापर्यंत जातात, व न्यायाधिशाच्या ठरावांतील टीकेचे शब्द काढून टाकण्याबद्दलचा हुकूम घेऊन येतात.

न्यायाधिशाला साक्षीदारावर जरूर टीका करता येते असें मला वाटतें. हा साक्षीदार जरी एखाद्या विशिष्ट पक्षाचा असला तरी देखील त्यावर कोर्टाला टीका करण्याचा खास अधिकार आहे असें मला वाटतें. कोर्टाच्या कारभारांत लुडबुड करण्याचें अशा तऱ्हेचे प्रयोग अस्थानी नाहींत काय ? मनुष्य कोणत्याही पक्षाचा असला तरी त्यानें न्यायाधिशाच्या कामांत लुडबुड करतां कामा नये असें मला वाटतें. त्याचप्रमाणें न्यायाधिशानें देखील मनुष्य कोणत्या पक्षाचा आहे हें पाहून निकाल करणें योग्य होणार नाहीं. आपणांस देखील असेंच नाहीं कां वाटत ?

उत्तर:—आपल्या देशामध्यें लोकशाहीचा राज्यकारभार सुरू झाल्यानंतर ज्याप्रमाणें धर्मातीत राज्य हें त्याचें वैशिष्ठ्य आहे, त्याचप्रमाणें पक्षांतील न्याय हें देखील वैशिष्ठ्य आहे. जर्मनीच्या नाझी राजवटीमध्यें सरकारी पक्षाला कायद्याच्या कोर्टांत विशेष सवलती मिळत असत; पण आपल्या देशाचें बलवत्तर भाग्य असें आहे कीं, आपण जी राज्यघटना तयार केली आहे त्यामध्यें धर्मातीत राज्य व पक्षातीत न्याय यावर फार मोठा भर देण्यांत आला आहे. अमुक मनुष्य अमुक पक्षाचा म्हणून निकाल त्याच्या बाजूला असा प्रकार जेव्हां आपल्या देशांत सुरू होईल त्या दिवशीं आपल्या लोकशाहीचे तीन तेरा न् नऊ अठरा वाजले असें म्हणण्यास तिळातांदुळाइतकाही प्रत्यवाय नाहीं.

सुदैवानें आपल्या भारतवर्षातील न्यायपरंपरा अत्यंत उच्च दर्जाची आहे. कोर्टानें निकाल करतांना फिर्यादी अथवा आरोपी अगर साक्षीदार कोणत्या पक्षाचे आहेत या गोष्टीला काडीमात्र किंमत न देतां निकाल केला पाहिजे, असा कायद्याचा दंडक आहे. असा प्रकार जर झाला नाहीं व निर्भयपणानें आणि प्रामाणिकपणानें न्याय देण्याचें काम न्यायाधिश सोडून देतील, तर बिन पायाच्या इमारतीप्रमाणें आपली लोकशाहीची सुदर इमारत केव्हांच रसातळाला जाईल. आपण असें लक्षांत ठेवा कीं, जो न्यायाधीश जात, गोत, धर्म, पंथ अथवा पक्ष पाहून निकाल देतो तो न्यायाधीश होण्याला नालायक आहे.

आपण आपल्या प्रश्नामध्यें कांहीं गोष्टींचा उल्लेख केला आहे तशाच तऱ्हेचा कांहींसा प्रकार एकदां कोर्टात घडला होता, व तो कज्जा अत्यंत गाजलेला म्हणून प्रसिद्ध आहे. त्या कज्जामध्यें जी तत्त्वें सांगितली आहेत त्यावरून तुम्हांला कळून येईल कीं, कोर्टाला आपल्या निकालपत्रकांत साक्षीदारावर—मग तो कोणत्याही का पक्षाचा असेना—टीका जरूर करतां येईल; मात्र टीका मर्यादित असली पाहिजे-निराधार, अनाठायी अगर गैरवाजवी असतां कामा नये. टीकेची मर्यादा जर कोर्टानें ओलांडली तर साक्षीदाराला हायकोर्टाकडे अर्ज देऊन निकाल पत्रकांतील आक्षेपार्ह मजकूर काढून टाकणेंत यावा अशी मागणी करतां येईल,

हायकोर्टाला देखील टीकेची मर्यादा लक्षांत घेऊन खालच्या कोर्टाच्या निकालपत्रकांतील आक्षेपार्ह भाग काढून टाकतां येईल.

जो कज्जा प्रत्यंत गाजलेला आहे असें मी म्हटलें त्या कज्जाचे नांव—

## ' मधुसूदन वि. सरकार '

( १९५१ ऑल इंडिया रिपोर्टर, ओरिसा, पान ९२ ) असें आहे.

त्याची हकीकत व निकाल थोडक्यांत खालील प्रमाणें आहे:—

मधुसूदन हा काँग्रेसवाला होता व प्रांतिक कायदे मंडळाचा सभासदहि होता. तो ज्या गांवीं रहात होता तेथील सिवराम नांवाच्या एका इसमाला गांवांतील लोकांनी मारलें. सिवरामला मारण्याच्या कामीं हरिहरनें पुढाकार घेतला होता. त्या प्रकरणाची वर्दी पोलिसांत देण्यांत आली; परंतु पोलिसांनीं दाद घेतली नाहीं. पोलिस सुपरिटेंडंटच्या कानावर ती गोष्ट गेली. शेवटीं पोलिसांनीं चवकशीस आरंभ केला व हरिहर व त्याचे साथीदार ह्यांच्यावर पीनल कोडच्या अनेक कलमान्वयें खटला भरला. तो खटला अर्थात् सिवरामला मारल्याबद्दलचा होता. त्या खटल्यांत फिर्यादी मधुसूदनची साक्ष झाली. मॅजिस्ट्रेटनीं आरोपींना संशयाचाच फायदा देऊन सोडून दिलें. मॅजिस्ट्रेटनीं आपल्या निकालपत्रकांत खालील उद्गार काढले होते—

" ह्या साक्षीदारानें अनेक गोष्टी कबूल केल्या आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, खटल्याच्या सुरवातीपासून शेवटपर्यंत त्याचें त्या खटल्यावर अतिशय लक्ष होतें. आरोपीविरुद्ध निकाल व्हावा म्हणून त्यानें पोलिस अधिकारी व इतर अधिकारी यांच्यावर वारंवार दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला. "

वरील विधानें निराधार व अब्रूस घातक असल्यामुळें अव्वल कोर्टाच्या निकालपत्रकांतून तीं काढून टाकण्यांत यावी असा मधुसूदननें हायकोर्टात क्रिमिनल प्रोसीजर कोडच्या कलम ५६१–आ अन्वये अर्ज दिला.

अव्वल कोर्टाच्या निकालावर हायकोर्टात अपील अथवा रिव्हिजन दाखल केलें नसलें, तरी अव्वल कोर्टाच्या निकालपत्रकांतील आक्षेपार्ह मजकूर काढून टाकण्याचा अधिकार, कलम ५६१ अ अन्वये हायकोर्टाला असतो किंवा नाहीं

हें आपण पाहूं. हायकोर्टाला तसा अधिकार नसतो असें १९४० ऑ. इं. रि. मुंबई २६६; रॉजर्स वि. श्रीनिवास ह्या निवाड्यांत ठरविण्यांत आलें आहे. उलटपक्षी हायकोर्टाला तसा अधिकार असतो असें हायकोर्टांनीं अनेक निवाड्यांत ठरविले आहे. आक्षेपार्ह विधानें निराधार व अनाठायीं असतील तरच हायकोर्टानें कलम ५६१-अ अन्वयें आपलें राखीव अधिकार उपयोगांत आणून ती विधानें काढून टाकावीं असें मत त्या निवाड्यांत व्यक्त करण्यांत आलें आहे.

अव्वल कोर्टाच्या निकालपत्रकांतील साक्षीदारासंबंधीची आक्षेपार्ह विधानें काढून टाकण्याचा आम्हांला अधिकार आहे असें आम्ही ठरवितों. तो अधिकार आम्हीं प्रस्तुतच्या मुकदम्यांत उपयोगांत आणावा किंवा काय हें आतां आपण पाहूं. मधुसूदनविषयीं खालच्या कोर्टानें जी आक्षिप्त विधानें केलीं आहेत त्यास कांहीं आधार आहे किंवा नाहीं हें आपल्याला अगोदर पाहिलें पाहिजे. ती विधानें निराधार असतील तरच आम्हांला तीं काढून टाकतां येतील.

आक्षेपार्ह विधानें बदनामीकारक आहेत व त्यामुळें मधुसूदनची किंमत कमी होणार आहे ह्या विषयीं आम्हाला मुळींच शंका नाहीं.

मधुसूदन हा एक प्रमुख कॉंग्रेस कार्यकर्ता आहे. शिवाय तो प्रांतिक कायदेमंडळाचा सभासदहि आहे. "मधुसूदननें आरोपी विरुद्ध निकाल मिळविण्यासाठीं अधिकाऱ्यावर वारंवार दडपण आणलें व आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला" ह्या विधानामुळें मधुसूदनची समाजांतील किंमत कमी होणार आहे ह्या विषयीं मुळींच वाद नाहीं.

मॅजिस्ट्रेटनीं निर्भिडपणें निकाल दिले पाहिजेत हें उघड आहे. साक्षीदारावर टीका करण्याचा अधिकारहि मॅजिस्ट्रेटांना असतो परंतु तो अधिकार मर्यादित स्वरुपाचा असतो. मॅजिस्ट्रेटनीं ती मर्यादा ओलांडून साक्षीदारांवर निराधार टीका केली असेल तर हायकोर्टानें आपले राखीव अधिकार उपयोगांत आणून ती विधानें काढून टाकणें न्याय्य ठरतें. प्रस्तुतच्या मुकदम्यांत

मॅजिस्ट्रेटनें ती मर्यादा ओलांडली किंवा काय हें आतां आपण पाहूं. त्यासाठीं आपल्याला थोडे तपशीलांत शिरावें लागेल. आरोपीचें मधुसूदनशीं नातें आहे. परंतु ते एकमेकांचें वैरी आहेत, पोलीस चौकशीत मधुसूदननें जातीनें भाग घेतला. सुरवातीला पोलीसानीं चौकशी नाकारली. परंतु मधुसूदननें वरून खटपट करून पोलिसांना खटला करावयास व खटला भरावयास लावले. मधुसूदननें पोलिस सुपरिंटेंडंटला त्यासंबंधीं एक पत्रहि पाठविलें. चौकशीच्या वेळीं पोलिसांनीं आरोपींना अटक करावी व जामिनावर सोडूं नये, असेंहि मधुसूदननें पोलिसांना सांगितलें. चौकशी करणाऱ्या पोलिस अधिकाऱ्याविरुद्ध मधुसूदननें मुख्य प्रधानाकडे एक पत्रहि पाठविलें होतें. वरील प्रकारावरून हेंच सिद्ध होतें कीं, मधुसूदननें आरोपीवरील खटल्याच्या बाबतींत नुसते लक्ष घातलें एवढेंच नव्हे तर प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदाला न शोभणारे वर्तनहि त्यानें केलें. हें सर्व खरें आहे परंतु मॅजिस्ट्रेटनें "वारंवार दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला" असें जें आक्षिप्त विधान आपल्या निकालपत्रकांत केलें आहे तें मात्र अनाठायीं व निराधार आहे. मधुसूदननें प्रस्तुतच्या मुकदम्यांत दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला असेल, परंतु "मधुसूदननें वारंवार असें केलें" असें म्हणणें बदनामीकारक आहे. कारण दुसऱ्या एखाद्या प्रकरणांत मधुसूदननें तसा प्रकार केला असें त्यावरून अनुमान निघतें. परंतु तसें अनुमान मधुसूदनच्या बाबतींत काढतां येत नाहींत; कारण कीं, दुसऱ्या एखाद्या प्रकरणांत त्यानें असाच प्रकार केला असें सिद्ध झालेलें नाहीं. सबब "मधुसूदननें वारंवार दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला" हें विधान पुराव्यानें सिद्ध होत नाहीं. तेवढ्यापुरते तें विधान निराधार ठरतें.

वरील विवेचनावरून आम्ही असा निष्कर्ष काढतो कीं, मुकदम्याची हकीकत विचारांत घेऊन मॅजिस्ट्रेटला आपल्या निकालपत्रकांत मधुसूदनविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख करतां येईल– "साक्षीदार मधुसूदन हा सुरवातीपासून शेवटपर्यंत सर्व कारवाईत जातीनें लक्ष घालीत होता. शिवाय आरोपीशीं त्याचें वैर आहे. सबब

त्याच्या साक्षीवर निःशंकपणें विश्वास ठेवतां येत नाहीं." त्या ऐवजी मॅजिस्ट्रेटनें आपल्या निकालपत्रकांत "मधुसूदननें अधिकाऱ्यावर वारंवार दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला" असा उल्लेख केला आहे. तसा उल्लेख करण्यांत मॅजिस्ट्रेटनें आपल्या अधिकाराची मर्यादा ओलांडली आहे, एवढेंच नव्हे तर त्या उल्लेखामुळें मधुसूदनवर अन्याय झाला आहे. शिवाय तो उल्लेख निरधार आहे. तो अन्याय दूर करण्यासाठीं आम्ही आपले राखीव अधिकार उपयोगांत आणून अव्वल कोर्टाच्या निकाल पत्रकांतील "मधुसूदननें अधिकाऱ्यावर वारंवार दडपण आणून आपल्या दर्जाचा दुरुपयोग केला" हें विधान काढून टाकण्यांत यावें असें ठरवून ह्या अर्ज मंजूर करतों.

# २७

# गिलावा व म्युनिसीपालिटी

## मनोरंजक व बोधप्रद कज्जा

**कोर्ट**—वादींचे वकीलास उद्देशून,

'या कज्जासंबंधी तुमचे काय म्हणणें आहे?'

**वादींचे वकील**—सन्मान्य न्यायाधीश साहेब, लांबलचक तक्रारी करून आपला बराच वेळ घेण्याची माझी इच्छा नाहीं. या कज्जाची हकीगत थोडक्यात अशी आहे. या कज्जातील वादी हे एक बरेच श्रीमान् व्यापारी आहेत. या कज्जांतील प्रतिवादी आपल्या कायदेशीर हक्कांबद्दल अत्यंत जागरूक आहों असें दाखविणारी, पांच डझन सभासद असलेली रमण...नगर म्युनिसीपालिटी आहे. वादींनीं एक घर विकत घेतलें व म्युनिसीपालिटीच्या परवानगीशिवाय त्या घराच्या भिंतींना सिमेंटचा गिलावा केला आणि खिडक्यांना पडदे लावण्याकरितां खिळे मारले अशी म्युनिसीपालिटीची तक्रार आहे. आपल्या परवानगीशिवाय वादींनी हें कृत्य केलें, व आपल्या हक्काला जागरूक असणें हे म्युनिसिपालिटीचें आद्य कर्तव्य आहे, असें समजून म्हणे प्रतिवादी...म्युनिसीपालिटीनें वादीवर

ऑनररी म्यॉजिस्ट्रेटच्या कोर्टांत बरोज ॲक्टच्या १२३ कलमाप्रमाणें फिर्याद गुदरली. वादीनीं आपण सिमेंटचा गिलावा करतांना म्युनिसीपालिटीची परवानगी घेतली नाहीं, एवढें कबूल केल्याबरोबर ऑनररी म्यॉजिस्ट्रेटनी वादींना पुढें बोलूच दिलें नाहीं. व त्यांना ताबडतोब पधरा रुपये पंधरा आणे दड झाला. वादीना दंड झाल्याबरोबर प्रतिवादी...म्युनिसीपालिटीनें वादीवर नोटीस बजावली कीं, वादीनीं परवानगीशिवाय केलेला गिलावा काढून घ्यावा व त्याचप्रमाणें खिडक्यांना पडद्याकरिता मारलेले खिळेही काढून घ्यावेत. यावर वादीनीं प्रतिवादी म्युनिसीपालिटीस अशी नोटीस दिली कीं, वर दिलेली नोटीस मागे घेण्यांस यावी, नाहींतर म्युनिसीपालिटीवर दावा लावण्यांत येईल. म्युनिसीपालिटीने उत्तर दिलें कीं, दिलेली नोटीस मागें घेण्याची कांहींच जरूरी नाहीं. वादीनें दावा लावल्यास म्युनिसीपालिटी आपले म्हणणे कोर्टांत जरूर शाबीत करील. इतकें झाल्यावर वादीनीं हा प्रस्तुत दावा लावला आहे व त्यांमध्यें असें मागणें केलें आहे कीं गिलावा व खिळे काढून घेण्याबद्दल आपणावर म्युनिसीपालिटीनें जी नोटीस बजावली आहे ती बेकायदेशीर, अन्यायाची व अंमलांत न आणण्यासारखी अशी आहे, असें ठरवून मिळावें..

ही कज्जाची हकीकत ऐकून कोणासही चमत्कारिक वाटेल. असल्या साध्या गोष्टीबद्दल म्युनिसीपालिटीनें कोर्टाची पायरी चढावी हें पाहून कोणासही आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. वादीचा शेजारी व्यापारी श्रीमान् आहे. त्यानें म्युनिसीपालिटीची परवानगी न घेतां आपलें सबंध घर बांधलें व हें घर बांधतांनाही म्युनिसीपालिटीच्या मालकीची ४०० चौरस फुट जागा दाबून रेटून आपल्या हद्दींत समाविष्ट केली आणि असें असतांनाही म्युनिसीपालिटीनें त्याच्यावर कांहींच इलाज केला नाहीं, असें पुराव्यांत निष्पन्न झालें आहे. केवळ गिलावा केल्याबरोबर वादीना म्युनिसीपालिटी कोर्टांत खेचून आणते व वादीच्या शेजाऱ्यांनीं म्युनिसीपालिटीच्या परवानगीशिवाय आपलें सबंध घर बांधलें व तें बांधतांना म्युनिसीपालिटीची कांहीं जागा रेटली, असें असूनही म्युनिसीपालिटी या गृहस्थावर कांहींच इलाज करीत नाहीं, याचें कारण इतकेंच कीं, वादीनीं

आजपर्यंत कोणत्याही म्युनिसीपल सभासदाला नमस्कार केला नाहीं अगर ह्यांजी ह्यांजी केली नाहीं. ह्याच्या उलट वादीच्या शेजाऱ्यानें म्युनिसीपल सभासदांना वेळीं अवेळीं वाटेल तितके नमस्कार केले आहेत व त्यांच्या निःस्वार्थीपणाबद्दल जिकडे तिकडे नगारा वाजविण्याचा प्रयत्न केला आहे. रमण नगर म्युनिसीपालिटीचे चेअरमन यांचे मुलाची मुंज होती व म्युनिसीपालिटीचे अध्यक्ष यांच्या घरीं मुलीचें लग्न होतें. त्यावेळीं वादीनीं आपली मोटार दिली नाहीं असें पुराव्यांत आलें आहे. ह्याच्या उलट वादीच्या शेजाऱ्यांची मोटार सदैव म्युनिसीपल सभासदांच्या तैनातीला असते व त्या मोटारीस, "म्युनिसीपालिटीची मोटार," असें म्हणतात; असेंही पुराव्यांत आलें आहे. या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे वादीला कोर्टात खेंचण्यांत म्युनिसीपालिटीचा काय उद्देश आहे हें समजून येईल.

"ह्या कज्जाकडे आणखी एका दृष्टीनें बघण्यासारखें आहे. वादीनीं म्युनिसीपालिटीच्या परवानगीशिवाय आपल्या घराला खिडक्यांना पडदे लावण्याकरितां खिळे मारले असें गृहीत धरलें तरी माझें असें म्हणणें आहे कीं, असल्या कृत्यांना म्युनिसीपालीटीची परवानगी लागत नाहीं. असल्या कृत्यांना परवानगी लागते असें म्हटलें, तरी सुद्धां असें म्हणतां येईल कीं, इंडियन पीनल कोड कलम ९५ मध्यें जें तत्व सांगितलें तें तत्व प्रस्तुत कज्ज्यालाही लागू करण्यांत यावें व क्षुल्लक गोष्टीकरितां गुन्हा होत नाहीं असें समजण्यांत यावें. दुसऱ्या भाषेंत आपणांस असें म्हणतां येईल कीं, गिलावा करणें अगर खिळे मारणें या गोष्टी इतक्या क्षुल्लक आहेत कीं, त्याबद्दल म्युनिसिपालीटीनें कोणाही मनुष्यास कायद्याच्या कोर्टात खेचणें योग्य होणार नाहीं. म्हणून कोर्टाला माझी अशी विनंती आहे कीं, वादीच्या वतीनें निकाल द्यावा व प्रतिवादी म्युनिसीपालिटीनें वादीवर गिलावा व खिळे काढून घेण्याबद्दल जी नोटीस बजावली आहे तिचा अम्मल करूं नये, अशी म्युनिसिपालीटीस कायमची ताकीद देणेंत यावी.

**प्र. वादीचे वकील.**—माझ्या विद्वान् मित्रांनीं ज्या तक्रारी सांगितल्या त्यावरून त्यांना असें म्हणावयाचें दिसतें कीं, हा कज्जा निव्वळ नमस्काराचा चमत्कार आहे. ह्यावर मला असें म्हणावयाचें आहे कीं, या कज्जांत नमस्काराचा

चमत्कार नसून कायद्याचा कठोरपणा आहे. कायद्याचें आद्य तत्व असें आहे कीं, कोणाही मनुष्यानें आपल्या हातांत कायदा घेतां कामा नये. वादी श्रीमंत असतील, त्यांच्या घरीं मोटार असेल अथवा त्यांनीं आपली मोटार कोणाला दिली नसेल अगर कोणाला दिली असेल, असले सर्व प्रश्न या कज्जांत गैरलागू आहेत. वादीनें केलेलें कृत्य कायद्याच्या कक्षेंत येते कीं नाहीं एवढेंच आपणांस पहावयाचें आहे. ह्याकामीं वादीचा काय हेतु आहे हें आपणांस बघण्याचें कारण नाहीं. कायदे पंडितांनीं असें सर्वसामान्य तत्त्व प्रस्थापित केलें आहे कीं, मनुष्याचें मन केवळ देवच जाणूं शकत असल्यामुळें व ती दैवी शक्ति कोणत्याही कोर्टाजवळ नसल्यामुळें कोर्टानें माणसाच्या हेतूंकडे न बघतां त्याच्या कृत्याकडे बघूनच न्याय करावयाचा असतो. या दृष्टीनें पाहिलें तर वादीनें म्युनिसीपालिटीच्या परवानगी शिवाय गिलावा केला हें शाबीत असल्यामुळें वादीनें तो गिलावा काढून टाकला पाहिजे हे न्याय्य सयुक्तिक व कायदेशीर आहे. आपण खिळे मारले असें वादी कबूल करीत नाहींत, परंतु खिळे तेथें नवीन दिसतात या गोष्टीवरून वादीनेंच ते खिळे मारलें असें समजण्यास हरकत नाहीं. हे खिळे म्युनिसी-पालिटीच्या परवानगी शिवाय मारले असल्यामुळें वादीनें ते काढून घेतलेच पाहिजेत.

"माझ्या विद्वान मित्रानीं ह्या कज्ज्यांत वादीच्या शेजारी गृहस्थानीं काय काय केलें याबद्दल उहापोह केला. त्या उहापोहाशीं आपणाला कांहींच कर्तव्य नाहीं. वादीचें कृत्य कायदेशीर नसेल तर म्युनिसीपालिटीनें जरूर कायदेशीर इलाज केला पाहिजे. आपल्या अधिकारास जपणें हें म्युनिसीपालिटीचें आद्य कर्तव्य असल्यामुळें, म्युनिसीपालिटीनें या कामीं दाखविलेली तत्परता खरोखर वाखाणण्यासारखी आहे.

"वादीतर्फे झालेल्या पुराव्यांत म्युनिसीपल गटारामध्यें किती चिखल सांठलेला आहे याचा उल्लेख करण्यांत आला; यावर मला कोर्टास असें आग्रह-पूर्वक सांगावयाचें आहे कीं, नगर सभेच्या सर्वच्या सर्व गटारामध्यें जितका चिखल आहे त्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त चिखल वादीतर्फे आज या कोर्टांत

उडविणेंत आला आहे. आमच्या गांवच्या सन्मान्य म्युनिसिपल सभासदांवर जी बेजबाबदार विधानें उधळण्यांत आलेली आहेत, त्याचा जितक्या जास्तीत जास्त कठोर शब्दानें निषेध करतां येईल तितका करणें हें मी माझें कर्तव्य समजतों. पराकाष्ठेचा स्वार्थत्याग करून सार्वजनिक कार्य करावें या उदात्त हेतूनें जे म्युनिसिपल सभासद काम करीत आहेत त्यांच्याबद्दल बेजबाबदार टीका करणें हे वादीच्या वकिलांना खरोखर शोभण्यासारखें नाहीं. वादीच्या वकीलांनीं म्युनिसीपल सभासदांबद्दल जी बेअदबीकारक विधानें केलीं त्याबद्दल त्यांचा मी निषेध करूं इच्छितों......"

**वादीचे वकील.** उत्तरादाखल......

"माझ्या विद्वान् मित्रांचा रागाच्या भरांत बराच तोल गेलेला दिसतो. माझ्यावर ते कितीही रागावले तरी त्यांच्यावर मी रागावूं इच्छित नाहीं. कायद्याच्या पुस्तकांत अशी एक म्हण दिली आहे कीं, ज्यावेळीं तुमची बाजू लंगडी असेल, त्यावेळीं तुम्हीं दुसऱ्या बाजूची निंदा करावी. माझी बाजू बळकट असल्यामुळें मी माझ्या विद्वान् मित्रांची निंदा करूं इच्छित नाहीं....मला एकच गोष्ट सांगावयाची आहे कीं, आपल्या अधिकाराला जपणें हें म्युनिसिपालिटीचें आद्य कर्तव्य आहे. व तोच रमणनगर म्युनिसिपालिटीचा बाणा आहे, असे विरुद्ध बाजूतर्फे ठांसून नि टिच्चून सांगण्यांत आलें. परंतु वादीच्या शेजारच्या गृहस्थानीं आपलें सबंध घर म्युनिसिपालिटीच्या परवानगीशिवाय बांधलें व तें बांधतांना म्युनिसिपालिटीची ४०० फूट चौरस जागा खुशाल रेटून घेतली त्यावेळीं तुमचा तो बाणा कुठें गेला होता......

झालेला पुरावा लक्षांत घेऊन व दोन्ही बाजूंचें म्हणणें ऐकून कोर्टानें खालील प्रमाणें निकाल वाचून दाखविला.

...वादीनें म्युनिसिपालिटीच्या परवान्याशिवाय आपल्या घराच्या भिंतींना सिमेंटचा गिलावा केला हें वादीस मान्य आहे. खिळ्याबद्दल मात्र त्याचें असें म्हणणें आहे कीं, हे खिळे आपण मारले नाहींत. ह्या कज्जांत म्युनिसिपालिटीचे विद्वान् चीफ ऑफिसर व तज्ञ हेल्थ ऑफिसर ह्यांच्या साक्षीवरून असे दिसतें कीं,

वादीनें आपल्या घराच्या भिंतीना गिलावा करून घेणें व खिडक्यांना पडदे लावण्याकरितां खिळे मारणें ही गोष्ट आरोग्याच्या व सुखसोईच्या दृष्टीनें अत्यंत युक्त अशी आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, वादीनें या बाबतींत म्युनिसिपालिटीकडे परवानगी मागितली असती तर म्युनिसिपालिटीनें ती ताबडतोब दिली असती; गिलावा करणें काय अगर खिळे मारणें काय ह्या गोष्टी बांधकामाच्या कायदेशीर कक्षेंत येत असल्यामुळें वादीनें त्याबद्दल म्युनिसिपालिटीकडे परवानगी मागणें जरूर होतें, असें विद्वान् तज्ञांचें म्हणणें आहे. या बाबतींत वादीनें केलेला गिलावा व मारलेले खिळे काढून घ्यावेत व म्युनिसिपालिटीची परवानगी घेऊन पुन्हां पूर्ववत् गिलावा करावा व खिळे मारावेत म्हणजे सर्व गोष्टी कायदेशीर होतील असें या विद्वान् तज्ञांना वाटतें.

कज्जांत वादीतर्फे इंडियन पीनल कोडमधील ९५ कलमाचा उल्लेख करण्यांत आला. त्या कलमामध्यें असें म्हटलें आहे कीं, कायद्याच्या व्याख्येमध्यें एखादें कृत्य गुन्हा होत असेल, तरी सर्वसाधारण दृष्ट्या ती गोष्ट अगदीं क्षुल्लक व तक्रार न करण्यासारखी असेल तर त्यामुळें गुन्हा होत नाहीं. इंडियन पिनल कोडमध्यें हें ९५ क. नसतें तर आपला टांक दुसऱ्याच्या दौतींत बुडवून घेणें, म्हणजे इंडियन पिनल कोडच्या ३७८ कलमाप्रमाणें चोरी झाली असती, अथवा घोड्यावर बसून दौडत जाणें व रस्त्यावरून चालणाऱ्या माणसांच्यावर धूळ उडविणें म्हणजे इंडियन पिनल कोडच्या ३५१ कलमांत सांगितलेला गुन्हा झाला असता, अगर मोटारींत चढत असतांना दुसऱ्या मनुष्यास रेटून चढणें म्हणजे इंडियन पिनल कोडमधील ३१९ कलमांत सांगितल्याप्रमाणें अपराध झाला असता. कायद्याच्या काटेकोर कक्षेंत एखादें कृत्य गुन्हा होत असलें तरी तें अगदींच क्षुल्लक असेल तर त्यांस गुन्हा मानण्यांत येऊ नये हें ९५ कलमाचें सार आहे. वादीतर्फे म्हणणें असें कीं, सिव्हील प्रोसिजर कोडमध्यें ह्याबद्दल स्पष्ट कलम नसलें तरी हें तत्व न्यायाच्या दृष्टीनें दिवाणी कोर्टानें अंमलांत आणण्यासारखें आहे.

"सर्व गोष्टींचा साधकबाधकपणें विचार करतां मला वाटतें कीं, वरील तत्वांचा अम्मल न करतांही ह्या कामीं योग्य तो निकाल करतां येईल. खिळ्यांच्या

बाबतींत वादीने ती गोष्ट नाकबूल केली असल्यामुळें व वादीनेंच खिळे मारले अशाबद्दल समाधानकारक पुरावा कोर्टापुढें येत नसल्यामुळें मी असें ठरवितों कीं प्रतिवादी म्युनिसिपालिटीनें खिळ्यांच्या बाबतींत दिलेली नोटीस रास्त नाहीं व हे खिळे वादीनें काढून घेतले पाहिजेत असें प्रतिवादी म्युनिसिपालिटीस म्हणतां येणार नाहीं.

"गिलाव्याच्या बाबतींत असें दिसतें कीं, म्युनिसीपालिटीची परगवानगी न घेतां आपण गिलावा केला हें वादीनें मान्य केलें आहे. ही बाब क्षुल्लक असली तरी कायद्याच्या कांटेकोरपणानें या बाबतींत निकाल करावा असें प्रतिवादीतर्फे म्हणणे आहे. त्याच्या उलट ही बाब क्षुल्लक असल्यामुळें, गिलावा काढून घेण्याबद्दल वादीस भाग पाडूं नये असें वादीतर्फे म्हणणें आहे. प्रस्तुत दाव्यांत कसा निकाल करावा ह्याचें दिग्दर्शन १९४२ मुंबई लॉ जरनल पान ४२१ यांत करण्यांत आलें आहे. त्यांत सांगितलेलें तत्त्व कायदा व सर्वसाधारण दृष्टी ह्या दोन्हीलाही सुसंगत आहे तें तत्त्व लक्षांत घेऊन मी खालीलप्रमाणें हुकूम करतों.

## हुकूम.

खिळ्यांच्या बाबतींत प्रतिवादी म्युनिसीपालिटीनें केलेली नोटीस बेकायदेशीर आहे असें मी ठरवितों. व त्या नोटीसीप्रमाणें अंमल करण्यांत येऊं नये अशी प्रतिवादी म्युनिसीपालिटीस मी कायमची ताकीद देतों.

"गिलाव्याच्या बाबतींत प्रतिवादी म्युनिसीपालिटीनें केलेली नोटीस कायदेशीर आहे असें ठरविण्यांत येत आहे. त्या नोटीसीप्रमाणें अंमल करण्यास प्रतिवादी म्युनिसीपालिटीस अधिकार आहे असें मी ठरवितो."

त्या नोटीसीप्रमाणें वादीनें पंधरा दिवसांच्या आंत जर भिंतीचा सिमेंटचा गिलावा काढला नाहीं तर तो गिलावा काढून टाकण्याचा अधिकार प्रतिवादी म्युनिसीपालिटीस आहे. म्युनिसीपालिटीतर्फे जो पुरावा झाला आहे त्यांत सिमेंटचा गिलावा ६५/१०० इंच जाडीचा आहे असें निष्पन्न झालें आहे. म्हणून कायद्याचें कांटेकोर तत्त्व लक्षांत घेऊन मी असें फर्मावितो कीं, म्युनिसी-

पालिटीनें बरोबर ६५/१०० इंच इतका भाग काढून घ्यावा. ह्या पेक्षां किंचित् कमी अगर किंचित जास्त भाग पाडण्यांत आला तर कोर्टाच्या हुकमाची ती बेअदबी आहे असें समजण्यांत येईल. व कोर्टाच्या बेअदबीमुळें होणाऱ्या परिणामास म्युनिसीपालिटीस जबाबदार राहावें लागेल.

"दाव्याच्या खर्चाबद्दल असा हुकूम करण्यांत येत आहे कीं, जर वादीनें पंधरा दिवसांत गिलावा काढून घेतला तर या दाव्याचा खर्च वादीवर बसविण्यांत येईल. वर हुकूम केल्याप्रमाणें बरोबर ६५/१०० इंच इतका भाग म्युनिसीपालिटीस काढतां आला तरी देखील ह्या दाव्याचा खर्च वादीवर बसविण्यांत येईल. वादीनें पंधरा दिवसांत गिलावा काढून घेतला नाहीं व नंतर म्युनिसीपालिटीनें गिलावा काढण्याचा प्रयत्न केला, परंतु बरोबर ६५/१०० इंच इतका भाग काढून घेण्यांत म्युनिसीपालिटीस यश आलें नाहीं तर प्रतिवादी म्युनिसीपालिटीनें आपला खर्च सोसून वादीचाही खर्च सोसावा. बरोबर ६५।१०० इंच इतका भाग काढून घेणें शक्य नाहीं असें समजून म्युनिसीपालिटीनें गिलावा काढण्याचा प्रयत्न केला नाहीं तरी सुद्धां प्रतिवादी म्युनिसिपालिटीनें आपला स्वतःचा खर्च सोसून वादीचा खर्च द्यावा."

वरीलप्रमाणें ठराव वाचून दाखविल्यानंतर कोर्टाच्या आवारांत पांच मिनिटेंपर्यंत सारखा टाळ्यांचा गजर चालूं होता......

---

# श्री. राम केशव रानडे यांची पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १. | स्त्रीधनाचा कायदा ... ... | सेंट्रल लॉ हाऊस नागपूर |
| २. | हिंदू विवाहाचा कायदा ... ... | ,, ,, |
| ३. | मृत्यूपत्राचा कायदा ... ... | ,, ,, |
| ४. | कर्जाबाबत कायदा ... ... | ,, ,, |
| ५. | देशमुख कायदा ... ... | ,, ,, |
| ६. | पोटगीबाबत कायदा ... ... | ,, ,, |
| ७. | दस्तऐवजाचा कायदा ... ... | ,, ,, |
| ८. | खरेदी-विक्रीचा कायदा ... ... | ,, ,, |
| ९. | दत्तकाचा कायदा ... ... | ,, ,, |
| १०. | स्मृतिकालीन कायदा ... ... | ,, ,, |
| ११. | पोलीसाबाबत कायदा ... ... | ,, ,, |
| १२. | मुदतीचा कायदा ... ... | ,, ,, |
| १३. | बापाचें कर्ज ... ... | ,, ,, |
| १४. | प्रॉमिसरी नोटीचा कायदा ... ... | व्हीनस बुक स्टॉल पुणें २ |
| १५. | स्त्रियांचा कायदा ... ... | ,, ,, |
| १६. | कोर्ट कथा ... ... | ,, ,, |
| १७. | Indian Legal Philosophy Series | ,, ,, |
| १८. | कायदा व लोकशाही ... ... | नवभारत प्रकाशन लि. सांगली. |
| १९. | मुद्रणाबाबत कायदे ... | मुद्रण प्रकाशन, शित्रशाळा पुणें २ |
| २०. | वधूवरांचा कायदा ... | न्यायाश्रम ऑफिस, ५०४ शनवार पुणें २ |
| २१. | संत तुकारामांचा समतावाद ... | अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणें २ |
| २२. | तुमचा वकील ... ... | रामकृष्ण बुक डेपो मुंबई ४ |
| २३. | कायद्याचें शंभर प्रश्न ... ... | ,, ,, |
| २४. | मजेशीर निवाडे ... ... | ,, ,, |

**टीप**—कांहीं कांहीं पुस्तकांच्या दुसऱ्या आवृत्या निघाल्या आहेत. कांहीं कांहीं पुस्तकें संपली आहेत. पुस्तकाबद्दल ग्रंथविक्रेत्याकडे अगर वरील प्रकाशकांकडे तपास करावा.

